संस्कृताभ्यासासाठी सर्वांना उपयुक्त

# हास्यप्रवाहः

विविध विषयांवरील प्रबोधक व रंजक

## संस्कृत-विनोदसंग्रह

मराठी अनुवादासह



- पं. स. त्र्यं. रहातेकर

ॐ

संस्कृताभ्यासासाठी सर्वांना उपयुक्त

# ।। हास्यप्रवाहः ।।

विविध विषयांवरील प्रबोधक व रंजक

## संस्कृत-विनोदसंग्रह

मराठी अनुवादासह

**लेखकः - पं. स. त्र्यं. रहातेकर**



# हास्यप्रवाहः


- **आवृत्ती -** द्वितीय ( २०१९ )

- **प्रकाशक -**

  सदाशिव त्र्यंबक रहातेकर

  डॉ. आंबेडकर पुतळ्याजवळ , कर्जत,
  जि. रायगड. पिन ४१०२०१

  दूरभाषांक - ०२१४८-२२३३१३

  ९७६५३१७३२२ / ९८६७८७०८२८

- **अक्षरजुळवणी -**

  श्री. रमण गांगल, कोतवालनगर, कर्जत

- **मुद्रक -**

  स्वाती मुद्रण, गोपी टॉकीजजवळ, डोंबिवली

- **वितरक -**

  सौ. नम्रता मणेर, २०४, अर्चिस अपार्टमेंट्स,
  पिंटो गॅसजवळ, विठ्ठलनगर, कर्जत, जि. रायगड.
  दूरभाषांक - ८०८७५७८१९५

- **किंमत - ₹ १००**

# ॡ हास्यप्रवाहः – एक हसरा अनुभव ॢ

— (प्रथम आवृत्तीवरील अभिप्राय) —

कर्जत (रायगड) येथे वास्तव्य करणारे श्री. स. त्र्यं. रहातेकर यांचे 'हास्यप्रवाहः' हे दुसरे पुस्तक प्रसिद्ध होत आहे. यात सुमारे नव्वद विनोद आणि प्रहेलिका (कोडी) यांचा समावेश आहे. संस्कृत भाषेतील विनोद व त्याखाली त्यांचे मराठी भाषांतर, तसेच वृत्तबद्ध काव्य आणि त्याचे गद्य मराठी भाषांतर असे पुस्तकाचे एकूण स्वरूप आहे.

पुस्तक वाचताना प्रकर्षाने जाणवते की लेखकाने विनोदाच्या माध्यमातून संस्कृत भाषेची गोडी उत्पन्न करण्याचा स्तुत्य प्रयत्न साधला आहे. मराठी भाषांतरामुळे वाचकांना विनोद समजणे सुलभ होते, पण त्याचवेळी अभ्यासूंना संस्कृतचा अभ्यास करणेही शक्य होते. आधुनिक काळाशी सुसंगत असे विनोद संस्कृत भाषेतूनही सहजपणे व प्रभावी रीतीने अभिव्यक्त करता येतात हे लेखकाने दाखवून दिले आहे.

फार वर्षापूर्वी प्रा. अर्जुनवाडकर (कण्टकार्जुन) यांनी 'कण्टकाञ्जलिः' हे आधुनिक परिस्थिती, राजकारण, समाजातील व्यक्तींच्या विविध प्रवृत्ती यावर खुसखुशीतपणे टीका करणारे पुस्तक लिहिले होते. त्यानंतर श्री. रहातेकरांचे त्याच प्रकारचे, विनोदात्मक 'हास्यप्रवाहः' हे पुस्तक प्रसिद्ध होत आहे.

सहज समजेल अशी सोपी रचना हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणता येईल. उदाहरणादाखल 'कथय कोऽहम्', 'विश्वदूतम्' इ. रचनांचा उल्लेख करता येईल. पूर्वी देह परोपकारासाठी कसा आहे याचे अनेक कवींनी वर्णन केले आहे. पण आजच्या काळात हा देह 'निजभोगशाला','वैद्यांची प्रयोगशाला' केमिस्ट लोकांची 'व्यवसायशाला' आणि रोगजंतूंची 'विहारशाला' आहे या विषयीचा श्लोक वस्तुस्थितीचा निदर्शक तर आहेच, पण शैलीदार रचनेचे उत्तम उदाहरणही आहे. 'यम-नियम' शब्दावरील श्लेष, पोलीस हे जनरक्षक की नाशक हा सतावणारा प्रश्न, आधारपत्र काढण्यासाठी ज्येष्ठांची होणारी फरफट, याविषयी श्री. रहातेकर यांनी मार्मिक टीका केली आहे.

समस्यापूर्ती हा संस्कृतमधील कविजनप्रिय काव्यप्रकार श्री. रहातेकर यांनीही सिद्धहस्ताने हाताळला आहे. 'समयसारिणी' (टाईमटेबल) विषयी श्लोक तर वस्तुस्थितीचे मार्मिक दर्शन घडवतो.

या लेखनाविषयी आश्चर्याची गोष्ट अशी की, श्री. रहातेकर यांनी केवळ शालेय स्तरापर्यंतच संस्कृतचे अध्ययन केले होते. नंतर रेल्वेच्या प्रदीर्घ नोकरीत संस्कृतचा संबंधही उरला नव्हता. सेवानिवृत्तीनंतर त्यांचा हा सर्व लेखनप्रवास झाला आहे. यात त्यांना मार्गदर्शन मिळाले ते कर्जतमधील संस्कृत पंडित, मराठी-संस्कृत कोशकार कै. मोरेश्वर के. काळे यांचे. एकलव्याच्या वृत्तीने संस्कृतचा मनापासून केलेला अभ्यास उत्तरायुष्यात 'आनंदाचा प्रपात' ठरतो हेच यावरुन सिद्ध होते.

त्यांच्या विविध वृत्तांतील काव्य रचना पाहता वृत्तरचनेवरील त्यांचे प्रभुत्व प्रकर्षाने जाणवते. काव्यमयता, विचारांचे नूतनत्व, रचनेचा सहजपणा व बांधेसूदपणा पाहता त्यांचा पुढचा संग्रह हा काव्यसंग्रह असेल असे निश्चित म्हणता येईल.

अध्ययनातील प्रदीर्घ खंड, पत्नी निधनासारखा भयंकर आघात, वाढत्या वयाने प्राप्त झालेल्या अनेक व्याधी यांचा प्रतिभेवर, काव्यस्फूर्तीवर अजिबात परिणाम होऊ न देता त्यांनी लिहिलेले हे पुस्तक वाचताना भर्तृहरीचे शब्द आठवतात -

प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचै:
प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्या:।
विघ्नै: पुन: पुनरपि प्रतिहन्यमाना:
प्रारब्धमुत्तमजना: न परित्यजन्ति।।

(सामान्य लोक विघ्ने येतील या शंकेने कामाला सुरुवातच करीत नाहीत. मध्यम प्रकारचे लोक कामाला सुरवात तर करतात, पण विघ्ने येऊ लागली की आरंभ केलेले काम अर्धवट सोडून देतात. पण जे उत्तम आहेत ते मात्र विघ्नांनी पुन्हापुन्हा अडथळे आणले तरी एकदा हाती घेतलेले कार्य कधीच टाकीत नाहीत.)

मृदुला श्री. गडनीस
सदस्य - 'गुञ्जारव' या संस्कृत त्रैमासिकातील संपादक मंडळ
निवृत्त संस्कृत शिक्षिका, कर्जत - रायगड

# ☙ लेखकाचे मनोगत ❧

माझे वडील त्र्यंबक नारायण रहातेकर हे ब्रिटिशकालीन तलाठी. ते कडाव येथील वडिलोपार्जित घरात रहात असत. त्यांचा संस्कृतचा व्यासंग चांगला होता. संस्कृतचे प्राथमिक धडे त्यांच्याकडूनच मिळाले. ते भागवताचार्य होते. मी मराठी चौथीत असताना त्यांनी मला भागवताच्या संपूर्ण १२ स्कंदांची संथा दिली. कर्जत येथील संस्कृत पंडित कै. मोरेश्वर केशव काळेशास्त्री यांचेकडूनही मला खूप शिकण्यास मिळाले.

रेल्वेतील जबाबदारीच्या प्रदीर्घ सेवाकाळात संस्कृतकडे लक्ष देण्यास जमले नाही. पण निवृत्त झाल्यावर माझा अभ्यास पुन्हा चालू केला. कर्जत येथील मेघदूत मंडळाच्या सदस्या मृदुला गडणीस, अनुपमा कुलकर्णी, सुलभा जोगळेकर व विलासिनी आरेकर यांनी मला लेखनासाठी प्रोत्साहित केले. माझ्या स्फुटलेखनास प्रसिद्ध करणारे अहमदनगर येथील गुञ्जारव ह्या त्रैमासिकाचे संपादक महामहोपाध्याय डॉ. दे. खं. खरवंडीकर यांचेही वेळोवेळी मार्गदर्शन लाभले.

माझे संस्कृतातून असलेले पहिले विनोदांचे पुस्तक लातूर येथील विद्याभारती प्रकाशनाने प्रसिद्ध केले आहे. दुसरे संस्कृत-मराठी विनोदांचे पुस्तक **हास्यप्रवाहः** हे हृषीकेश प्रकाशनाने २०१६ साली प्रसिद्ध केले. ह्या पुस्तकाबद्दल अनेकांनी दूरध्वनीने अथवा पत्रद्वारा माझी प्रंशसा केली आहे. रामटेक येथील संस्कृत विश्वविद्यालयाने हे पुस्तक अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त असल्याचे कळविले आहे. सर्व प्रशंसा सरस्वतीचरणी समर्पित आहेत.

**सदर पुस्तक ही त्याचीच सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती आहे**.

सदर पुस्तकात म्हणजे **हास्यप्रवाहः** ह्या पुस्तकाच्या द्वितीयावृत्तीत, प्रथमावृत्तीत राहून गेलेल्या मुद्रणदोषांचे निराकरण केले आहे. संस्कृत भाषेतील विनोद व त्याखाली त्याचे मराठी भाषांतर असे ह्या पुस्तकाचे स्वरूप आहे. ह्यातील संस्कृत-मुद्रितशोधनाचे कामी बदलापूर येथील संस्कृत पंडित राजेंद्र दातार यांची बहुमोल मदत झाली. दरम्यानच्या काळात म्हणजे २०१७ साली **काव्यप्रवाहः** हा माझा संस्कृत रचनांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला आहे. ह्या दोनही पुस्तकांचा उपयोग

संस्कृत शिकणाऱ्यांना, रसास्वाद घेणाऱ्यांना, संस्कृतातून लेखन व काव्यरचना करू इच्छिणाऱ्यांना निश्चितपणे होईल.

ह्या हास्यप्रवाहात अनवधानाने काही त्रुटी, मुद्रणदोष राहिले असतील तर ते रसिकांनी क्षमाशील राहून निदर्शनास आणून द्यावेत, ही विनंती. सर्व हितचिंतकांना धन्यवाद.

पं. सदाशिव त्र्यंबक रहातेकर
कर्जत, जि. रायगड

## ❦ अर्पणपत्रिका ❦

**माझा पहिला विनोद अहमदनगर येथील गुञ्जारव या त्रैमासिकात डिसेंबर १९९७ मध्ये प्रकाशित झाला. तेव्हापासून मी आजपर्यंत काव्ये व विनोद स्वरूपात संस्कृत स्फुटलेखन करीत आहे.**
**माझी धर्मपत्नी सौ. शैलजा सदाशिव रहातेकर हिचे दि. २१-७-२०११ रोजी निधन झाले.**
**माझे संस्कृत लेखन ती आवर्जून वाचीत असे.**
**त्यामुळे तिला भाषेचे समजण्याइतके ज्ञान प्राप्त झाले होते.**
**तिच्या प्रोत्साहनामुळे मी आजपर्यंत लेखन केले.**
**तिच्या पवित्र स्मृतीस सदर कृतीचे समर्पण.**

सदाशिव त्र्यंबक रहातेकर
कर्जत, जि.रायगड

# अनुक्रमणिका

## १. स्वभावकृपणो ब्राह्मणः

मार्गेण गच्छन्नेकः स्वभावकृपणो ब्राह्मणो जलवाहिनीं स्थापयितुं महापालिकया क्रियमाणे एकस्मिन् गभीरगर्ते पतितः। स्वभावातिकृपणः स दानं शब्दं नाजानात्। गृहाण, गृह्णातु, गृह्यताम् एतान् शब्दान् जानाति स्म। अत्रान्तरे तं ब्राह्मणं पतितं दृष्ट्वा केचिदन्यपथिकाः तत्रागताः। ते ब्राह्मणम् अब्रुवन् , 'भो विप्रश्रेष्ठ ऊर्ध्वं देहि तव हस्तौ येन अस्माभिरपकृष्टस्य ते ऊर्ध्वारोहणं सुलभं भवेद्' इति। किन्तु स विप्रः अधो मुखं कृत्वा निश्चलः स्थितः ।

पश्चात् ब्राह्मणस्य स्वभावं जानन्नेकः पान्थः तत्र समुपस्थितः। स्वहस्तं न यच्छतो ब्राह्मणस्य कृतिं विचार्य स पुरत आगत्य तमाह । 'भो विप्रवर गृहाण मे हस्तम् ।' गृहाण शब्दं श्रुत्वा स विप्रः स्वहस्तम् ऊर्ध्वमकरोत्। तस्य हस्तं, स्वहस्ते धारयित्वा पथिकः तं बहिर्निस्सारितवान् । जना अवदन्, 'पश्यत कृपणतामस्य'। जनैर्निन्दितः लज्जितः स सवेगं पलायितः ।

अनुवाद – **कंजूष ब्राह्मण**

रस्त्याने जाणारा, स्वभावाने कंजूष असा एक ब्राह्मण नगरपालिका करीत असलेल्या जलवाहिनीसाठीच्या एका खोल खड्ड्यात पडतो. स्वभावतःच कंजूष असल्यामुळे त्याला 'देणे' हा शब्दच माहित नव्हता. फक्त घ्या, घ्या, घ्यावे हेच शब्द त्यास माहित होते. इतक्यात त्या ब्राह्मणास पडलेला पाहून काही वाटसरु तेथे आले. ते ब्राह्मणास म्हणाले, 'अहो गुरुजी, आपले दोन्ही हात वर द्या म्हणजे आम्हास आपल्याला ओढून काढणे सोपे जाईल.' परंतु तो ब्राह्मण खाली मान घालून निश्चल उभा राहिला.

इतक्यात या ब्राह्मणाचा स्वभाव माहित असलेला एक वाटसरु स्वतःचा हात न देणाऱ्या ब्राह्मणाच्या वागण्यासंबंधीचा विचार करुन पुढे येऊन त्यास म्हणतो, 'अहो गुरुजी, माझा हात घ्या.' लगेच त्याचा हात आपले हाताने पकडून त्या वाटसरुने ब्राह्मणास बाहेर काढले. लोक म्हणाले, 'पहा हो त्याची कंजूषी.' लोकांच्या निंदेमुळे तो लाजून वेगाने तेथून पळून गेला.

# २. वृक्षारोपणम्

**कोऽपि शिक्षानिरीक्षकः कस्मिंश्चिज्जनपदे निरीक्षणार्थं एकस्मिन् विद्यालये सम्प्राप्तः। निरीक्षणकार्यं समाप्य मुख्याध्यापकः तं वृक्षारोपणाय प्रार्थितवान् । तस्यैतत् पवित्रकार्यमवलोकयितुं विनीताः छात्राः तथा ग्रामप्रमुखेण सह जानपदा अपि उपस्थिताः। मुख्याध्यापकः तं शालासमीपम् किमपि वृक्षरहितं स्थलं नीतवान् । आरोपणार्थं प्रागेव गर्तमेकं खातमासीत् । मुख्याध्यापको ब्रवीति, 'क्रियतां भवता रोपणम् एतस्मिन्नेव गर्ते। मृदुकृष्णमृत्तिका विपुला विद्यतेऽत्र। सुष्ठु स्थानमिदं ननु । एतस्मिन्नेव गर्ते प्रतिवर्षं प्रावृषि वयं वृक्षारोपणं कुर्मः' इति ।**

अनुवाद – **वृक्षारोपण**

कोणी एक शिक्षणाधिकारी एका खेडेगावातील शाळेत तपासणीसाठी गेले. तपासणी झाल्यानंतर तेथील मुख्य शिक्षकांनी त्यांना वृक्षारोपण करण्याची विनंती केली. त्यांचे हे पवित्र कार्य पाहण्यास तेथील खेडूत, गावातील पुढारी व विनम्र विद्यार्थी या वेळी उपस्थित राहिले. मुख्याध्यापकांनी त्या अधिकाऱ्यास झाडे नसलेल्या चांगल्या जागी नेले. वृक्षारोपणासाठी अगोदरच खड्डा खोदून ठेवलेला होता. यावेळी मुख्याध्यापक त्यांना या खड्ड्यात वृक्षारोपण करण्याची विनंती करतात व त्यांना सांगतात, 'साहेब, येथे काळीभोर माती विपुल आहे. खरोखरीच ही जागा योग्य अशीच आहे. आणि हो, दर पावसाळ्यात आम्ही याच खड्ड्यात वृक्षारोपण करतो.'

# ३. चायपानम्

**एकदा कोऽपि पुरुषः प्रातरुत्थाय भार्यां वदति, 'अयि प्रिये, सम्प्रति चायगृहं गत्वा चायं पास्यावः।' पत्नी ब्रवीति, 'भोः पतिवर किमर्थमेवं चिन्तयति भवान् । नाहमस्वास्थ्यमनुभवामि। चायमुत्कथनार्थं कियान् समयो लगति? धनव्ययोऽपि किमर्थं कार्यः?' पतिः प्रत्युत्तरति, 'भोः प्रियतमे, तव कथनं सत्यमेव। तव पाककौशल्यं तथा मितव्ययशीलनं को न जानाति?**

**मम मित्राणि प्रशंसन्ति त्वाम् । तथापि नित्यक्रमानुसारेण प्रत्यहं क्रियमाणं चषकशरावाणां प्रक्षालनं नाहं कर्तुं कामयेऽद्य।'**

अनुवाद – **चहापान**

एकदा एक माणूस सकाळी उठून पत्नीस म्हणतो, प्रिये आज तू चहा करु नकोस. आपण हॉटेलात जाऊन चहा पिऊ या. त्यावर पत्नी म्हणते, आपला का बरं असा विचार आहे? मला काहीही त्रास होत नाही. अहो चहा करण्यास असा किती वेळ लागतो? तसेच उगाच खर्च कशासाठी? पती म्हणतो अगं तू म्हणतेस ते सर्व खरेच आहे. तुझे पाककौशल्य व नियमितपणा कोणास माहीत नाही? माझे सर्व मित्रही तुझी प्रशंसा करतात. परंतु रोजच्या रोज नियमितपणे कपबशा आज धुण्याची मला इच्छा होत नाही.

## ४. दन्तवैद्यः

**दन्तपीडामसहमानः कोऽपि संस्कृतपण्डितः दन्तचिकित्सालयं सम्प्राप्तः। तं परीक्ष्य लब्धकीर्तिश्चिकित्सकः दन्तमूलम् असंवेदनीकृत्य द्वौ दन्तौ अविलम्बम् उत्पाटितवान् । चिकित्सकाय शुल्कं प्रदाय पण्डितः स्वगृहं प्रतिनिवृत्तः । अन्येद्युः स चिकित्सालयं चिकित्सकाय स्वकुशलं कथयितुं गतवान् । चिकित्सकः तं सप्रश्रयं ब्रवीति, 'भोः पण्डितवर एतस्मिन् संस्कृतवर्षे, संस्कृतवचनं कांचित् रम्यां कथां वा भवतः मुखात् श्रोतुमिच्छामि।' तस्य वचः श्रुत्वा शान्तस्वभावः स्मिताननः पण्डितः सपदि विनोदप्रचुरश्लोकं तं श्रावयति। ----**(दत्नवैद्यं क्षमा याचित्वा)

**दन्तवैद्य नमस्तुभ्यं स्तेनज्येष्ठसहोदर ।**
**स्तेनस्तु हरति द्रव्यं त्वं तु द्रव्यं द्विजानपि ।।** (द्विज = दात, ब्राह्मण)

अनुवाद – **दंतवैद्य**

दात दुखणे असह्य झालेले एक संस्कृत पंडित दातांच्या दवाखान्यात गेले. तेथील प्रथितयश डॉक्टरांनी त्यांच्या हिरड्यांना बधीर करुन लगेचच दोन दात उपटले.

डॉक्टरांना फी देऊन पंडित आपले घरी आले. दुसरे दिवशी ते डॉक्टरांकडे त्यांना प्रकृतीबाबत सांगण्यासाठी गेले. डॉक्टर त्यांना आदरपूर्वक म्हणतात, पंडितजी, या संस्कृतवर्षात एखादे संस्कृतवचन किंवा चांगली रम्य गोष्ट आपले मुखातून ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्यांचे ते बोलणे ऐकून अत्यंत शांत असलेले हसऱ्यामुखाचे पंडितजी लगेचच विनोदी काव्य ऐकवतात -----

(दंतवैद्यांची क्षमा मागून)

**चोराचा थोरला भाऊ असणारे अहो डॉक्टर महाशय,**
**चोर तर फक्त धन चोरतो आपण मात्र दातासकट पैसेही चोरता.**

## ५. कारागृहेषु बन्धुजनाः

**कस्मिंश्चित् कारागृहे कोऽपि बन्दी तस्यैव कक्षे दण्डमुपभुञ्जानमन्यं बन्दिनं सकुतूहलं पृच्छति, ' रे मित्र षण्मासात् प्राक् त्वमत्रागतोऽसि। ततः प्रभृति अहं पश्यामि यद् न कोऽपि तव बन्धुजनः त्वां मिलितुमागच्छति। न ते बन्धुवर्गो वा? ' अन्यो बन्दी सखेदमाह , 'रे मम ज्येष्ठमित्रवर मम बहवो बन्धुजनाः सन्ति किन्तु सर्वेऽपि विविधेषु कारागृहेषु ।'**

अनुवाद – **तुरुंगात भाईबंद**

एका तुरुंगात एक कैदी त्याच खोलीत शिक्षा भोगत असलेल्या दुसऱ्या एका कैद्यास कुतूहलाने विचारतो, अरे मित्रा सहा महिन्यांपूर्वी तू येथे आला आहेस. तेव्हापासून मी पहातो की तुझा कोणीही नातेवाईक तुला भेटण्यासाठी येथे येत नाही. तुला कोणीही नातेवाईक नाहीत काय? दुसरा कैदी अत्यंत खेदाने म्हणतो, अरे मित्रा मला अनेक नातेवाईक आहेत. परंतु ते सर्व निरनिराळ्या तुरुंगात.

## ६. निमज्जन् पुरुषः

**एकदा सूर्यग्रहणपर्वणि कोऽपि पुरुषः स्नानार्थं नदीमगात्। तरणमजानन् सः अचिराज्जलौघेनोढः। निमज्जन्तं तं दृष्ट्वा तस्याक्रन्दनं श्रुत्वा च तरणं जानन्ती वस्त्रं प्रक्षालयन्ती तत्रस्था कापि नारी सपदि जले उदपतत्। पुरुषं**

**स्कन्धे धृत्वा महता यासेन सा तं तीरमानयत् । तं भूमौ निपात्य तस्योदरं प्रविष्टं जलं प्रथमोपचारेण निस्सारितवती । प्राप्तसञ्ज्ञः स द्रुतमुत्थाय निभृतं स्वगृहमगच्छत् । वार्तैषा झटिति नगरे प्रसृता ।**

**अन्येद्युः कापि महिलामण्डलाध्यक्षा कार्यकर्तृभिः सह तस्या गृहं सम्प्राप्ता। अध्यक्षा तामभिनन्द्य पृच्छति, 'हे वीराङ्गने, कथयतु भवती स्वप्राणान् अविगणय्य कस्य प्रेरणया भवत्या एतद्धाष्टर्यं कृतम्? भवत्याः कृतिर्नारीणां गौरवस्थानं ननु।' साऽब्रवीत्, 'धनागारं मम प्रेरणास्थानम् । निमज्जन्तं पुरुषं सम्यग्जानाम्यहम् । तेन धनागारात् ऋणं गृहीतम् । प्रतिभूपत्रे तेन मम पत्युः हस्ताङ्कनम् आप्तम्' इति ।**

अनुवाद – **बुडणारा इसम**

एकदा एक इसम सूर्यग्रहणात स्नासाठी नदीवर गेला. त्याला पोहता येत नसल्यामुळे थोड्याच वेळात तो पाण्याच्या प्रवाहात वाहू लागला. बुडणाऱ्या त्या माणसास पाहून तसेच त्याची किंकाळी ऐकून तेथे कपडे धुणाऱ्या, पोहता येणाऱ्या एका बाईने पाण्यात उडी घेतली. त्या बाईने मोठ्या धैर्याने खांद्यास पकडून त्या माणसास तीरावर आणले. तसेच त्यास जमिनीवर पाडून प्रथमोपचाराने तिने त्याचे पोटातील पाणी काढले. शुद्धीवर येताच तो माणूस लगेच उठून गुपचुप घरी निघून गेला. ही बातमी गावात लगेच पसरली.

दुसरे दिवशी महिला मंडळाच्या अध्यक्षा आपल्या कार्यकर्त्यांसह तिच्या घरी आल्या. तिचे अभिनंदन करुन तिला विचारले हे वीराङ्गने तू आपले प्राणाची पर्वा न करता कोणाच्या प्रेरणेने एवढे धारिष्ट केलेस? ती म्हणते, 'अहो 'बँक' हे माझे प्रेरणास्थान आहे. त्या बुडणाऱ्या माणसास मी चांगली ओळखते. त्याने बँकेकडून कर्ज घेतले आहे व जामीनदार म्हणून करारपत्रावर त्याने माझ्या पतीची सही घेतली आहे.'

## ७. नापितस्य श्रेष्ठत्वम्

**कश्चित् वृद्धः संस्कृतपण्डितो मुण्डनं कर्तुमिच्छुः केशकर्तनालयं सम्प्राप्तः। नापितः तस्मै किञ्चित्कालार्थं प्रतीक्षापीठे उपविश्य वृत्तपत्रं**

**पठितुम् अकथयत् यतः त्रिचतुराः ग्राहकाः पूर्वमेव तत्रोपविष्टा आसन् ।**

**मुण्डनानन्तरं नापितः पण्डितं वदति, 'भोः पण्डितवर भवन्तम् अहं सम्यक् जानामि। दक्षिणहस्ते लगुडं गृहीत्वा लगुडाग्रं भूमौ स्थापयित्वा शनैः शनैः मार्गेण चलन्तं भवन्तमहं पश्यामि। ममापि संस्कृतभाषायां रुचिर्विद्यते। आकाशवाण्या प्रसार्यमाणं संस्कृतवृत्तमहं प्रत्यहं शृणोमि। दशम्यां कक्षायां पठन्ती मम दुहिता संस्कृतश्लोकोच्चारणस्पर्धायां प्रतिवर्षं भागं गृह्णाति। श्रावयतु कमपि गीर्वाणश्लोकं काञ्चित् कथां वा। तावदुपहारगृहात् चायमानेतुं भृत्यं प्रेषयामि।' स्ववदनं दर्पणेऽवलोकयन् कृतमुण्डनः पण्डितः सपदि श्लोकमेकं विरचय्य तं श्रावितवान् ।**

**श्रेष्ठत्वं को न जानाति नापितस्य पुरे पुरे ।**<br>
**राजापि पुरतो यस्य शिरो नमयति स्वयम् ।।**

अनुवाद – **न्हाव्याची महती**

एक वृद्ध संस्कृत पंडित केस कापण्यासाठी केशकर्तनालयात गेला. त्याचे अगोदर तीन-चार अन्य गिऱ्हाईके असल्यामुळे न्हाव्याने त्यांना बाकावर बसून वर्तमानपत्र वाचण्यास सांगितले.

केस कापून झाल्यानंतर न्हावी त्यांना म्हणतो अहो पंडितजी मी आपणांस चांगला ओळखतो. आपण उजव्या हातात काठी घेऊन काठीचे टोक जमिनीवर टेकवून हळू हळू रस्त्याने जाताना मी आपणास पाहतो. मला सुद्धा संस्कृत भाषेत गोडीआहे. आकाशवाणीवरुन प्रसारित होणारे संस्कृत बातमीपत्र मी रोज ऐकतो. दहाव्या इयत्तेत शिकणारी माझी मुलगी संस्कृत श्लोकांच्या स्पर्धेत दरवर्षी भाग घेते. काही संस्कृत श्लोक किंवा एकादी कथा मला ऐकवा ना, तोपर्यंत उपहारगृहातून चहा आणणेसाठी नोकरास पाठवितो. हजामतीनंतर आपला चेहरा आरशात पहात लगेचच पंडित एक श्लोक रचून त्यास ऐकवितात –

गावागावातून न्हाव्याची महती कोणास माहीत नाही?<br>
ज्याच्यापुढे राजासुद्धा आपले डोके वाकवितो.

# ८. चौरस्य स्मरणम्

**एकस्मिन् प्रशान्तायां रात्रौ कोऽपि स्तेनः कस्यचिन्मन्त्रिणः प्रासादं परितः सन्तं प्राकारमतिक्रम्य प्राङ्गणं प्राविशत् । अचिरात् स जागरुकेण प्रासादरक्षकेण धृतो मन्त्रिणः पुरतः स्थापितश्च। तं वीक्ष्य मन्त्री साश्चर्यं वदति, 'एष तु स एव चौरः यो वर्षपूर्वमत्र हि धृत आसीत् । रे कुम्भीलक स्मरसि वा? ' स्तेनो ब्रवीति, 'सुष्ठु जानाम्येतद् । अहं भवते धन्यवादान् समर्पयामि यतो भवता मम स्मृतिर्निहितास्ति। इदानीमेतस्मिन् धनानुगामिनि जगति कः कं स्मरति ? '**

अनुवाद – **चोराची ओळख**

एकदा एका चोराने रात्रीच्या शांत वेळी एका मंत्र्याच्या बंगल्याभोवती असलेले कुंपण ओलांडून आवारात प्रवेश केला. तेथील रखवालदाराने सावधपणे त्यास पकडले व मंत्रीमहोदयांच्या पुढे उभे केले. त्याला पाहून मंत्री आश्चर्यचकित होऊन म्हणतात या चोराला तर आपण पूर्वीच पकडले होते. अरे चोरा तुला आठवते का? चोर म्हणतो, अहो हे मला चांगले आठवते. मी आपणास धन्यवाद देतो. कारण आपण माझी ओळख ठेवलीत. हल्ली पैशाच्या मागे असलेल्या या जगात कोण कोणाची ओळख ठेवतो?

# ९. चिक्कीखण्डः

**अथैकदा रेलयाने त्रिस्तरीयशायिकायां उपविष्टः कोऽपि यात्रिकः तस्य पार्श्वे उपविष्टमन्यं यात्रिकं पृच्छति, 'भोः सज्जन किमर्थं भवान् वारंवारं तनुम् अवनमय्य मम चरणौ स्पृशति? किं मृगयतेऽधः?' अन्यो यात्रिको ब्रवीति, 'मम मुखाद् अवपतितं चिक्कीखण्डं अन्विष्यामि'। ततः प्रथमोऽपरं वदति, 'अलं कष्टेन। अन्यं खण्डमत्तु भवान् ।' अन्यो यात्रिकः प्रत्युत्तरति, 'किं क्रियतां यतः चिक्कीखण्डे संसक्ता दन्तावलिरपि पतितास्ति मम मुखात् ।'**

अनुवाद – **चिक्कीचा तुकडा**

एकदा रेल्वेतील शयनयान डब्यात प्रवास करणारा एक प्रवासी त्याचे शेजारी

बसलेल्या अन्य प्रवाशास विचारतो अहो सदगृहस्थ, तुम्ही वारंवार अंग वाकवून माझ्या पायाला का स्पर्श करीत आहात? खाली काय शोधत आहात? दुसरा प्रवासी म्हणतो माझ्या तोंडातून चिक्कीचा तुकडा खाली पडला आहे तो मी शोधत आहे. त्यावर पहिला प्रवासी त्यास म्हणतो तुम्ही उगाच कष्ट करु नका. चिक्कीचा दुसरा तुकडा खा. दुसरा प्रवासी त्यास पुन्हा म्हणतो, काय करु, अहो चिक्कीच्या तुकड्यास चिकटलेली दातांची कवळी तोंडातून खाली पडली आहे ना !

## १०. मूर्खाय नमः

**कस्मिंश्चिन्नगरे कोऽपि सज्जनः विद्युत्देयकधनं धनागारे भर्तु प्रस्थितः मार्गमध्ये सम्मुखमागतं तस्य पूर्वप्रतिवेशिनं स दृष्टवान् । मुहूर्तमेकं स्थित्वा सज्जनः प्रतिवेशिनं नमस्कृत्य तं कुशलं पृष्टवान् । प्रतिवेशी ब्रवीति, 'नाहं मूर्खमभिवादनम् करोमि।' सज्जनः सस्मितमाह, 'किन्त्वहं करोमि' इति ।**

अनुवाद – **मूर्खास नमस्कार**

एक सज्जन विजेचे बील भरण्यासाठी एका बँकेकडे निघाला. रस्त्यात समोरुन येत असलेला त्याचा एकेकाळचा शेजारी त्यास भेटला. किंचित थांबून सज्जन शेजाऱ्यास नमस्कार करुन त्याची खुशाली विचारतो. शेजारी (रागाने) त्यास म्हणतो, 'मी मूर्खास नमस्कार करीत नाही.' लगेचच सज्जन स्मितहास्य करुन त्यास म्हणतो, 'पण मी करतो ना.'

## ११. वराकः आईन्स्टाईनः

**अणुशक्तेस्तत्त्वं जगति प्रतिष्ठापयन् आईन्स्टाईन नामकः विख्यातः शास्त्रज्ञः त्रिदिवसीयविज्ञानसम्मेलनार्थं किञ्चिन्नगरं सम्प्राप्तः। एकस्मिन् प्रभाते मन्दं मन्दं वर्षति पर्जन्ये स और्णवस्त्रं परिधाय प्रभातचलनार्थं प्रतस्थे। मार्गमध्ये स किमप्युपहारगृहं प्रविष्टः। पदार्थसूचिपत्रम् उत्पीठे तस्य पुरतः स्थापयन्तं तत्रस्थं भृत्यं स्वल्पशर्करायुतं चायमानेतुमादिष्टवान् । अल्पावधौ भृत्यः चायं तथा तद्दिनस्य आङ्ग्लवृत्तपत्रम् उत्पीठे न्यदधात्।**

**शास्त्रज्ञमहोदयस्य सविधे तस्योपनेत्रं नासीत् । अतो वृत्तपत्रे मुद्रितानि कानिचित् पीवरशीर्षाक्षराण्यवलोक्य काञ्चिद्वार्तां पठितुं भृत्याय कथितवान्। भृत्योऽब्रवीत् , 'भोः सज्जन क्षमस्व, नाहं कस्यामपि पाठशालायां प्रविष्टः बाल्यादा। भवत्सदृशमहमपि निरक्षरोऽस्मीति ।' वराक आईन्स्टाईनः ।**

अनुवाद – **बिचारा आईनस्टाईन**

अणुशक्तीचे तत्त्व जगात प्रस्थापित करणारा आईनस्टाईन नावाचा प्रख्यात शास्त्रज्ञ तीन दिवसांच्या वैज्ञानिक संमेलनासाठी एका शहरात आला. एकदा सकाळचे प्रहरी थोडा थोडा पाऊस पडत असतांना उबदार कपडे घालून तो प्रभात भ्रमणासाठी (मॉर्निंग वॉक) निघााला. रस्त्यात तो एका उपहारगृहात शिरला. पदार्थांचे सुचिपत्र (मेनूकार्ड) त्याचे पुढ्यात ठेवणाऱ्या तेथील नोकरास तो कमी साखर घातलेला चहा आणावयास सांगतो. थोड्याच वेळात नोकराने चहा व त्या दिवसाचे इंग्रजी वर्तमानपत्र टेबलावर आणून ठेवले.

आईनस्टाईनजवळ त्याचा चष्मा नव्हता. म्हणून त्याने ठळक बातम्या नजरेखाली घालून काही बातम्या नोकरास वाचून दाखविण्यास सांगितले. नोकर म्हणतो, 'साहेब माफ करा, मी लहानपणापासून कोणत्याही शाळेत गेलो नाही. मी आपल्यासारखाच निरक्षर आहे. ' बिचारा आईनस्टाईन ।

## १२. नूतनगृहक्रीणनम्

**अथैकदा कोऽपि सज्जनः पाकगृहयुतां द्विकक्षसदनिकां क्रेतुमिच्छन् किञ्चित् गृहसङ्कुलं वास्तुप्रतिनिधिना सह सम्प्राप्तः। अहर्निशं जलोपलब्धिं तथा आम्राशोकादिभिर्वृक्षैः परिवेष्टितं तत्रस्थं प्रदूषणमुक्तं परिसरं दृष्ट्वा तस्य महान् सन्तोषः जातः। पार्श्वसदनिकायाः स्वामिना सह सम्भाषणं कृत्वा स्वगृहं न्यवर्तत भार्यायै सदनिकावृत्तं सहर्षं न्यवेदयत् च।**

**पत्नी ब्रवीति, 'भोः पतिवर वृत्तमेतद् श्रुत्वा अहं नितरां मुदमाप्नोमि। मन्येऽहं कदा तां सदनिकां मम सखीभिः सह द्रक्ष्यामि। कदा एतद् गृहं त्यक्ष्यामि, किन्तु कथयतु, प्रतिवेशिनं भवान् पृष्टवान् वा यद् तस्य गृहे**

**मिश्रकः, गर्जनाघटी, शीतपेटी, उत्पीठव्यजनादीनि वस्तूनि वर्तन्ते न वा? '**

अनुवाद – **नवीन घर खरेदी**

एकदा एक सद्गृहस्थ दोन खोल्या स्वयंपाकगृहासह जोडलेला ब्लॉक (टू रुम, किचन) विकत घेण्यासाठी एका वास्तुप्रतिनिधीसह एक गृहनिर्माण संस्थेत गेला. रात्रंदिवस पाण्याची सोय, तसेच आंबा, अशोक इत्यादी झाडांनी वेढलेला प्रदूषणमुक्त तेथील परिसर पाहून त्यास खूप समाधान वाटले. शेजारच्या खोलीच्या मालकांशी बातचीत करुन तो घरी परतला व पत्नीस आनंदाने खोलीसंबंधी सांगू लागला.

पत्नी म्हणते, अहो पतिराज, हे वर्णन ऐकून तर मला खूपच आनंद होत आहे. आणि असं वाटतं की मला माझ्या मैत्रिणीसह केव्हा ती खोली पहायला मिळेल? केव्हा ही खोली सोडीन. परंतु अहो हे सांगा, की आपण शेजाऱ्याकडे ही चौकशी केली का की त्यांच्या घरी मिक्सर, गजराचे घड्याळ, फ्रीज तसेच टेबलफॅन इत्यादी वस्तू आहेत का?

## १३. द्विगुणं वेतनम्

**अथैकदा काचित् सदनिकास्वामिनी ललाटे हस्तं निधाय पात्राणि प्रक्षालयन्तीं दासीं सकोपं पृच्छति, 'भोः सेविके अधुना सावधानेन चेतसा न किमपि कार्यं क्रियते त्वया। एतस्मिन् सप्ताहे चषकशरावाणि तथा अन्यानि काचपात्राणि कियन्ति भग्नानि त्वया। सम्प्रति न सह्यते हानिरेषा। हानेरपि सीमा भवति। न ते लज्जा वा तत्कृते ? भग्नानां वस्तूनां मूल्यं जानासि वा? तत्तु तव वेतनस्य द्विगुणं भवति।' दासी मन्दं विहस्य ब्रवीति, 'भोः स्वामिनि तर्हि मम वेतनं द्विगुणं करोतु भवती।'**

अनुवाद – **दुप्पट पगार**

एकदा एक सदनिका मालकीण कपाळावर हात ठेवून भांडी घासणाऱ्या मोलकरणीस रागाने विचारते, अगं तू अलीकडे मन लावून कोणतेही काम करीत नाहीस. या आठवड्यात कपबशा तसेच कितीतरी काचेच्या वस्तुंची मोडतोड केलीस. आता मला हे नुकसान सहन होत नाही. नुकसानाला सुद्धा काही मर्यादा असते. तुला लाज कशी वाटत नाही? मोडतोड झालेल्या वस्तुंची किंमत तुला माहीत आहे का?

ती तुझ्या पगाराच्या दुप्पट आहे. मोलकरीण किंचित हसून म्हणते, अहो मालकीण बाई तर मग माझा पगार दुप्पट करा की?

## १४. निम्बूकविक्रेता

**रथ्यातटे निम्बूकानां नित्यं विक्रयं कुर्वन्तं कञ्चित् विक्रेतारं कश्चित् सज्जनः पृच्छति, 'हे विक्रेतः, अहं नित्यं पश्यामि यत् प्रत्यहं त्वं अतिपक्वानि तथा शुष्कनिम्बूकानि तडागतीरे क्षिपसि, तडागतोयं प्रदूषयसि च।' फलविक्रेता ब्रवीति, 'भोः सज्जन, एतादृशानां निम्बूफलानां विषये न मे चिन्ता स्यात् परश्वतः। पश्यतु सम्मुखस्थं नवीनमुटजम् । तद् इक्षुरसगृहं वर्तते। पश्यतु तस्योद्घाटनसमारम्भस्य पात्रिकामेताम् । न भवान् ज्ञातवान् वा? ' श्रुत्वैतद् तस्य वचः सज्जन उच्चैः हसन् निर्गतः।**

अनुवाद – **लिंबूविक्रेता**

रस्त्याच्या कडेला नेहमी लिंबे विकणाऱ्यास एक सज्जन विचारतो, अरे मी नेहमी पाहतो की, तू दररोज खराब पिकलेली तसेच सुकलेली लिंबे तळ्याच्या काठावर फेकतोस व तळ्यातील पाणी दूषित करतोस. हे काही चांगले नाही. लिंबू विक्रेता म्हणतो, अहो महोदय, आता परवापासून मला अशा लिंबांची काही काळजी नसेल बघा. ती पहा पुढचीच नवीन झोपडी. अहो ते रसाचे दुकान आहे. ही पहा त्या दुकानाच्या उद्घाटन समारंभाची आमंत्रण पत्रिका. तुम्हास समजले नाही का? त्याचे हे बोलणे ऐकून सज्जन मोठ्याने हसत तेथून निघून गेला.

## १५. दण्डकालः

**दण्डकालं समाप्य कारागृहात् विमुक्तं बन्दिनं कारागृहाधीक्षको वदति, 'भोः सज्जन, कारावासे तवाचरणं समीचीनमासीत् । बन्दिनां मध्ये समुद्भूतः कलहः कोलाहलो वा नैकवारं त्वया विरमितः। तेषाम् असहकारान्दोलने त्वमेवास्माकं त्राता आसीः। तवात्र वासः चिरस्मरणीयः सेत्स्यति। किन्तु अस्माकं प्रमादात् तव मोचनं विलम्बेन भवति। तव मोचनदिनाङ्कः**

**मासपूर्वमेवासीत् । तदर्थं वयं नितरां खेदमनुभवामः।' बन्दी सविनयं वदति, 'भो अधीक्षकमहोदय, अलं खेदेन, मया उपभुक्तं अतिरिक्तदण्डकालं ममात्र पुनरागमने समीकरोतु भवान् ' इति ।**

अनुवाद – **लिंबूविक्रेता**

तुरुंगवासाची शिक्षा संपल्यामुळे सुटलेल्या एका कैद्यास तुरुंगाधिकारी म्हणतो, अरे सद्गृहस्था तुरुंगातील तुझी वागणूक चांगली होती. कैद्यांमधील झालेली भांडणे, गोंधळ अनेक वेळा तू थांबवलेस. त्यांच्या असहकार चळवळीत तूच एकटा आमचा रक्षणकर्ता होतास. तुझे येथील रहाणे कायम आमच्या आठवणीत राहील. परंतु आमच्या चुकीमुळे तुझी येथील सुटका उशीरा होत आहे. तुझ्या सुटकेचा दिवस महिन्यापूर्वीच होता. त्याबद्दल आम्हाला फार दुःख होत आहे. कैदी आदराने म्हणतो, अहो साहेब, मुळीच वाईट वाटून घेऊ नका. मी जी जास्त शिक्षा भोगली आहे ती मी पुढच्या खेपेस येथे आल्यावर तुम्ही सुरळीत ॲडजेस्ट करुन घ्या की.

## १६. हस्ताक्षरम्

**कस्याश्चित् नगरपालिकायाः मराठीपाठशालां कोऽपि शिक्षानिरीक्षको निरीक्षणार्थम् आगतः। चतुर्थ्यां कक्षायां पठन्तं कमपि छात्रं तस्य टिप्पणीपुस्तिकाम् अवलोक्य हसन् पृच्छति, 'रे गर्दभ कथं वर्तते तव हस्ताक्षरम् ? एतादृशं मलिनाक्षरं नाहं दृष्टवान् प्राक्, एतद् दृष्ट्वा अन्ये गर्दभा अपि हसिष्यन्ति।' छात्रः सविनयं ब्रवीति, 'भोः गुरुवर्य, ममाक्षरेण मम चेतो नितरां खिद्यते, किन्तु भवान् किमर्थं हसति? '**

अनुवाद – **हस्ताक्षर**

नगरपालिकेच्या एका मराठी शाळेत एक निरीक्षक इन्स्पेक्टर तपासणी करण्यासाठी आला. चवथीच्या वर्गात शिकत असलेल्या एका विद्यार्थ्यास त्याची वही पाहून हसत विचारतो, अरे गाढवा, काय तुझे हे अक्षर! इतके घाणेरडे अक्षर यापूर्वी मी पाहिले नाही. हे पाहून दुसरी गाढवेही हसतील. विद्यार्थी नम्रतापूर्वक म्हणतो, गुरुवर्य माझ्या अक्षरामुळे मला अत्यंत वाईट वाटते. परंतु मग आपण का हसता?

## १७. वातुलाश्रमः

**अथैकदा कस्मिंश्चिन्नगरे वातुलानां शुश्रूषागृहे द्वौ वातुलौ निरीक्षणार्थम् आगतं चिकित्सकं वदतः, 'भो चिकित्सकवर भवत्पूर्वं बहवः चिकित्सकाः निरीक्षणाय अत्रागत्य गतवन्तः। किन्तु सर्वेष्वपि भवान् श्रेष्ठः, आवाभ्याम् भृशं रोचते।' चिकित्सको वदति, 'भोः चतुरौ, किमर्थं युवामेवं वदथः? मयि तेषु च को भेदोऽस्ति? ' द्वावपि कथयतः, 'यतः भवदाचरणं साक्षादावयोः सदृशं वर्तते।'**

अनुवाद – वेड्यांचे इस्पितळ

एकदा एका वेड्यांच्या इस्पितळात दोन वेडे तपासणीसाठी आलेल्या डॉक्टरांना विचारतात, डॉक्टरसाहेब आपलेपूर्वी अनेक डॉक्टर तसेच इन्स्पेक्टर येथे येवून गेले. परंतु सर्वांमध्ये आपण सरस (श्रेष्ठ) आहात. आम्हाला आपण खूप आवडता. डॉक्टर म्हणतात, 'अरे शहाण्यांनो तुम्ही हे कशावरुन बोलता? माझ्यात व त्यांच्यात काय फरक आहे?' 'कारण आपले वागणे साक्षात आमच्यासारखे आहे,' दोघेही म्हणतात.

## १८. वस्त्रफेनकम्

**अथैकदा काचिल्ललना बालकस्य द्वितीयवर्धापनदिननिमित्तं स्यूतानि नूतनवस्त्राणि वस्त्रफेनकेन प्रक्षालितवती। अन्येद्युः सा सामान्यवस्त्रभाण्डारं गत्वा तत्रस्थं स्वामिनं सकोपं ब्रवीति, 'भोः स्वामिन् निष्फलं वर्तते अत्र क्रीतं वस्त्रफेनकम्? तस्योपयोगेन मम बालकस्य वस्त्राणि न्यूनीभूतानि। मन्येऽहं भवान् प्रतिरूपवस्तूनि विक्रीणीते, ग्राहकमञ्चं गत्वा, भवद्विरुद्धम् अभियुञ्जे।' स्वामी सविनयं ताम् उपदिशति, 'भोः महोदये अलं चिन्तया, तेनैव फेनकेन भवती भवद्बालकम् उष्णोदकेन द्वित्रिवारं स्नापयतु येन वस्त्राणि लीलया, शरीरानुरुपाणि सुस्थितानि भविष्यन्ति ।'**

अनुवाद – कपडे धुण्याचा साबण

एकदा एका स्त्रीने आपल्या बाळाच्या दुसऱ्या वाढदिवसाप्रीत्यर्थ शिवलेले नवीन

कपडे कापड धुण्याच्या साबणाने धुतले. दुसरे दिवशी ती त्या जनरल स्टोअरमध्ये जाऊन तेथील मालकास रागाने म्हणते, अहो मालक येथून विकत घेतलेला कपड्याचा साबण व्यर्थ आहे. तो वापरुन माझ्या बाळाचे कपडे आखूड झाले. मला वाटते आपण डुप्लीकेट मालाची विक्री करता. ग्राहक मंचात जाऊन आपले विरुद्ध तक्रार दाखल करते. मालक अत्यंत नम्रपणे तिला म्हणतो, अहो मॅडम आपण काळजी करु नका. आपण त्याच साबणाने गरम पाण्याने आपल्या बाळाला दोन-तीन वेळा न्हावू घाला, ज्यामुळे अगदी सहजपणे बाळाचे कपडे त्याचे शरीरानुसार अगदी योग्य होतील.

# १९. साभारनियमनम्

**निदाघकाले कस्मिंश्चिद्दिने मध्याह्ने कश्चित्समाजसेवकः कैश्चित् कार्यकर्तृभिः सह महाराष्ट्रविद्युन्मण्डलस्य कार्यालयं गत्वा तत्रस्थं मुख्याभियन्तारं सकोपं पृच्छति, 'भोः महोदय पश्यतु सम्प्रति नगरे विद्युद्वितरणं न विद्यते। भारनियमनवेलानुसारं विद्युत्स्तम्भनं भवति। तथापि अधुना अकालेऽपि वितरणं वारंवारं खण्डितं क्रियते। किमर्थं भवान् नागरिकान् पीडयति?' अभियन्तृमहोदयः आगतान् स्वेदपूर्णमुखान् तान् आसन्दीषु उपवेश्य शीतपेयं पाययित्वा किञ्चिद् विहस्य ब्रवीति, 'भोः एतद् तु साभारनियमनम् ।'**

अनुवाद – **साभारनियमन**

एके दिवशी उन्हाळ्यात एक सामाजिक कार्यकर्ता त्याच्या काही कार्यकर्त्यांसह महाराष्ट्र विद्युत मंडलाचे कार्यालयात जाऊन तेथील मुख्य अभियंत्यास रागाने विचारतो, अहो महाशय, पहा आता शहरात कोठेही वीज नाही. भारनियमाच्या वेळांप्रमाणे विद्युतपुरवठा खंडित होतो, परंतु अवेळी सुद्धा, सारखा विद्युतपुरवठा खंडीत केला जात आहे. आपण लोकांना असे का छळता? त्यावर मुख्य इंजिनियर घामाने ओलेचिंब, चेहरे असलेल्या त्यांना खुर्च्यांवर बसवून तसेच थंड पेये पाजवून थोडेसे चेहऱ्यावर हास्य दाखवून म्हणतो, अहो हे तर आपल्याच सहकार्याचे 'साभारनियमन' आहे.

## २०. सूचकवन्दना

**संस्कृतार्थं यतमानः प्राप्तराज्यपुरस्कारः कश्चिन्निवृत्तसंस्कृतशिक्षकः पौत्रस्य जन्मवर्धापनदिननिमित्तं स्यूतानि नूतनवस्त्राणि आनेतुं तस्य अङ्गुलिधृतपौत्रेण सह सीवनविपणिं सम्प्राप्तः। तत्रस्थः सूचकः पण्डितवरस्य पूर्वच्छात्र आसीत् । संस्कृतार्थं पृथक्शिक्षावर्गं न गच्छन् स तस्मिन् विषये गुणाधिकत्वे सदैव प्रथमत्रिष्वासीत् । पण्डितवरान् सादरं प्रणम्य स तं किञ्चित् सुभाषितं श्रावयितुं विज्ञापितवान् । छात्रस्य प्रार्थनां स्वीकृत्य पण्डितवरः तमित्थं श्रावयति ।**

**सूचक त्वां नमस्यामि स्तेनज्येष्ठसहोदर ।।**
**स्तेनश्छिनत्ति कोषान् हि त्वं तु कोषान् गलानपि ।।**

अनुवाद – **शिंप्यास नमस्कार**

संस्कृत भाषेसाठी प्रयत्न करणारे राज्यपुरस्कारप्राप्त एक निवृत्त संस्कृत शिक्षक आपल्या नातवाच्या वाढदिवसानिमित्त शिवलेले नवीन कपडे आणण्यासाठी करंगळी हातात धरलेल्या नातवासह एका शिंप्याच्या दुकानात आले. तेथील शिंपी संस्कृत पंडितांचा माजी विद्यार्थी होता. संस्कृतसाठी वेगळ्या शिकवणी वर्गास न जाणारा तो संस्कृत विषयात जास्त गुण मिळविणाऱ्या पहिल्या तिघांत नेहमी असे. पंडितजींना आदरपूर्वक नमस्कार करुन त्यांना काही सुभाषित ऐकविण्याची विनंती केली. आपल्या विद्यार्थ्याची विनंती स्वीकारुन पंडितजी असे त्यास ऐकवितात –

चोराच्या वडील बंधू असणाऱ्या हे शिंपीदादा मी तुला नमस्कार करतो.
चोर फक्त खिसेच कापतो, तू तर खिसे व गळेसुद्धा.

## २१. सेतोरवस्था

**अथैकदा कश्चित् शासकीयः ज्येष्ठाभियन्ता तस्य साहाय्यकाभियन्तारं ब्रवीति, 'भोः महोदय, नगरस्य क-विभागे गतमासे आवाभ्यां सुस्थितीकृतस्य सेतोरवस्था भीषणा वर्तते । कन्मिन्नपि क्षणे स पतिष्यति ।'**

**समयोपरि कृतज्ञापनार्थं साहाय्यकस्तस्मै धन्यवादान् समर्प्य तं ब्रवीति, 'तर्हि तन्मार्गं विहाय अन्यमार्गेणागमिष्यामि श्वस्तनदिनादारभ्य ।'**

अनुवाद – **पुलाची अवस्था**

एकदा एक सरकारी कार्यालयातील ज्येष्ठ अभियंता (सिनिअर इंजिरिअर) त्याच्या सहाय्यक अभियंत्यास म्हणतो, 'महोदय, शहराच्या 'क' वॉर्डातील आपण गेल्याच महिन्यात डागडुजी केलेल्या पुलाची अवस्था भयानक आहे. कोणत्याही क्षणी तो कोसळेल.' अगदी वेळीच माहिती दिल्याबद्दल सहाय्यक त्यास धन्यवाद देऊन म्हणतो, 'तर मग मी उद्यापासून तो मार्ग सोडून दुसऱ्या वाटेने येईन.'

## २२. रुग्णनीतिः

**दूरदर्शनं द्रष्टुं मग्ना कस्यचित् चिकित्सकस्य भार्या द्वारघण्टिकानादं श्रुत्वा तं वदति, 'कश्चित्नूतनो रुग्णो द्वारे तिष्ठतीति दृश्यते।' चिकित्सकस्तां वदति, 'भोः प्रिये कथं ब्रवीषि एवम्? पुरातनो रुग्णः कथं न स्यात् ?' भार्या लीलया ब्रवीति, 'अहो अहो एकवारम् औषधानि गृहीत्वा निर्गतो रुग्णः पुनरागतः कदापि दृष्टो वा भवता? '**

अनुवाद – **रुग्णनीती**

**दूरदर्शन पाहण्यात मग्न असलेली एक डॉक्टरची पत्नी दारावरची बेल ऐकून डॉक्टरांना म्हणते कोणीतरी नवा पेशंट दारात उभा आहे असे वाटते. डॉक्टर तिला म्हणतो प्रिये, तू असे कशावरुन म्हणतेस? पत्नी अगदी सहज म्हणते, अहो एकदा औषधे घेऊन निघून गेलेला पेशंट पुन्हा परत आलेला आपण कधी पाहिलाय का?**

## २३. कक्षाप्रवेशाः विरताः

**कस्मिन्नपि नगरे कश्चित् काष्ठवस्तुकर्मशालास्वामी पुत्रस्य प्रवेशार्थं काञ्चित् पाठशालां सम्प्राप्तः। प्रवेशद्वारे कक्षाप्रवेशाः विरताः इति पृथुशब्दैः लिखितं फलकं दृष्टवान् । चिन्ताग्रस्तोऽयं सत्वरं सोपानमार्गेण ऊर्ध्वतलस्थं मुख्याध्यापकप्रकोष्ठं प्रविष्टवान् । प्रधानाचार्यं प्रणम्य स पुत्रस्य प्रवेशार्थं तं**

**प्रार्थयते । मुख्याध्यापकः तस्य असमर्थतां प्रकटीकृत्य ब्रवीति, 'भोः महोदय कृपया क्षाम्यतु भवान् । कक्षायां न स्थानं विद्यते।' स्वामी सादरं वदति, 'भोः गुरुवर तथा मा वदतु , तद्विषये चिन्ता माऽस्तु । छात्रद्वयार्थं नवीनमासनं निर्माय सपदि प्रेषयामि । तदर्थं मापनं कथयतु भवान् ।'**

अनुवाद – **वर्गप्रवेश बंद**

एका गावात एक लाकडाच्या वस्तु बनविणाऱ्या दुकानाचा मालक मुलाच्या प्रवेशासाठी एका शाळेत जातो. प्रवेशद्वारात 'प्रवेश बंद' असा ठळक अक्षरातील फलक त्यास दिसला. काळजीत असलेला तो लगेच जिन्याने वरच्या मजल्यावरच्या मुख्याध्यापकांच्या खोलीत शिरला. या मुख्याध्यापकांस नमस्कार करुन त्याच्या मुलाच्या प्रवेशासंबंधी विनंती करतो. मुख्याध्यापक त्यांची असमर्थता प्रकट करुन म्हणतात, 'अहो महाशय, कृपा करुन क्षमा करा. वर्गात जागा नाही.' दुकानाचा मालक आदरपूर्वक म्हणतो, 'अहो गुरुवर्य, असे म्हणू नका हो. तुम्हाला त्या बाबतीत चिंता नको. दोन विद्यार्थ्यांसाठी नवीन बाक तयार करुन लगेच पाठवितो. त्यासाठी माप द्या.'

## २४. प्रत्यर्पणम्

**एकस्मिन् दिने कश्चित् सज्जनः आरक्षिबलस्थानके नियुक्तं निरीक्षकं भ्रमणध्वनिद्वारा पृच्छति, 'भोः निरीक्षकमहोदय कथयतु भवान् रक्षापुरुषाणां कुटुम्बकल्याणकार्यालयस्य सङ्केतस्थलं, तस्य दूरभाषक्रमाङ्कं वा।'**

**निरीक्षकस्तं पृच्छति, 'भोः सज्जन को भवान्? किमर्थमस्माकं कल्याणकार्यालयस्थलं पृच्छति? ' सज्जनो वदति, 'अहं सर्वकारीयसेवकानां शुभचिन्तकोऽस्मि। भवत्कल्याणकार्यार्थं धनं दातुम् इच्छामि।' निरीक्षको वदति, 'साधु। भवत्सदृशानां महाभागानामस्माकं गर्वोऽस्ति। भवदर्थं यानं प्रेषयाणि वा? किन्तु कथयतु किमर्थं भवान् अस्मद्कल्याणार्थं धनं दातुमिच्छति। भवता नवभवनं निर्मितं, नवं यानं क्रीतं वा?' सज्जनो वदति ' शृणोतु , गतवर्षे एतस्मिन्नेव मासे अहं दिनत्रयं यावत् कारागृहे स्थापितः**

**आसम्। तस्मिन् काले भवत्कर्मचारैः प्राप्तप्रसादात् मम पुरातनी कटिपीडा सर्वथा व्यरमत् ।'**

अनुवाद – **प्रत्यर्पण**

एकदा एक सज्जन पोलीस स्टेशनवर नेमणुकीस असलेल्या इन्स्पेक्टरला मोबाईल फोनवर पोलिसांच्या कुटुंबकल्याण कार्यालयाचा पत्ता किंवा टेलिफोन नंबर द्यावा अशी मागणी करतो.

पोलीस इन्सपेक्टर त्यास विचारतो, 'अहो सज्जन आपण कोण आहात? आमच्या कुटुंबकल्याण कार्यालयाची कशासाठी चौकशी करीत आहात? ' सद्गृहस्थ म्हणतो, 'मी शासकीय कर्मचाऱ्यांचा हितचिंतक आहे. आपल्या लोकांच्या कल्याणार्थ मी पैसे देऊ इच्छितो.' इन्स्पेक्टर म्हणतो 'ठीक आहे. आपल्यासारख्या लोकांचा आम्हास अभिमान वाटतो. आपलेसाठी काही वाहन पाठवू का? परंतु प्रथम हे सांगा की आपण आम्हास कशासाठी देणगी देऊ इच्छिता? आपण नवीन घर बांधले आहे काय? नवीन गाडी घेतली आहे काय?' सदगृहस्थ म्हणतो, 'अहो ऐका, गेल्या वर्षी याच महिन्यांत मी तीन दिवस आपले लॉकअपमध्ये होतो. त्या काळात आपल्या कर्मचाऱ्यांकडून मला जो प्रसाद मिळाला त्यामुळे माझी फार वर्षांपासूनची कंबरदुखी पूर्णपणे थांबली.'

## २५. अवनतशिराः पुत्रः

**अथैकदा साप्ताहिकावकाशे कश्चित् युवा मित्रगृहम् अगच्छत् । मित्रं शाकविपणिं गतमासीत् । तेन सह सङ्गोष्ठीं कुर्वन् मित्रस्य पिता युवानं पृच्छति, 'भो युवन् , मम पुत्रः युष्मत्कार्यालये सेवां करोति। कथय स तत्र कथमाचरति।' युवा ब्रवीति, 'भोः तात, तस्याचरणं सम्यग् भवति। अस्माकं वरिष्ठोऽपि तस्य कार्याय स्पृहयति, किन्तु प्रश्नमेकं पृच्छेयम् वा?' शङ्कितमनाः दर्शितादरः युवा भाषते, 'स नित्यं शिरोऽवनमय्य एव चलति। नैकवारम् अहं तस्मै नित्यप्रवृत्तिमेनां त्यक्तुमकथयम् । किन्तु तस्याचरणे न किमपि परिवर्तनभवत् ।'**

**एतद् सम्भाषणं शृण्वती मित्रस्य माता तत्र आगत्य तस्य कौतूहलं**

**शमयितुं ब्रवीति, 'शृणु शृणु, एकस्मिन्दिने अवनतशिराः मार्गेण गच्छन् मम पुत्रः मार्गे रूप्यात्मकं नाणकमेकम् आप्तवान् । तद्दिनादारभ्य तेन तथैव आचरणमारब्धम् ।'**

अनुवाद – **मान खाली वाकवून चालणारा मुलगा**

एकदा आठवड्याच्या सुट्टीत एक तरुण आपल्या मित्राच्या घरी गेला. मित्र भाजी आणण्यासाठी भाजी बाजारात गेला होता. त्याच्याबरोबर गप्पागोष्टी करीत मित्राचे वडील मुलाच्या मित्रास विचारतात, 'माझा मुलगा आपल्या कार्यालयात नोकरी करतो. पण सांगा त्याचे तेथील वागणे कसे आहे?' तरुण म्हणतो, 'बाबा त्याचे वागणे व्यवस्थित आहे. आमचे साहेबांनासुद्धा त्याचे काम आवडते.' मित्र आदरपूर्वक परंतु साशंक मनाने म्हणतो, 'तुम्हाला एक प्रश्न विचारु का? तो नेहमी मान खाली वाकवून चालतो. अनेक वेळा मी त्यास ही सवय सोडण्यास सांगितले. परंतु त्याच्या वागण्यात काहीही बदल झाला नाही.' हे संभाषण ऐकत मित्राची आई तेथे येऊन त्यांचे कुतूहल दूर करण्यासाठी म्हणते, 'अरे ऐक, ऐक. मान खाली घालून रस्त्याने एकदा तो जात असतांना माझ्या मुलाला रस्त्यात एक रुपयाचे नाणे सापडले आणि त्या दिवसापासून त्याचे तसे वागणे सुरु झाले.'

## २६. प्रगतिः

**अथैकदा कार्यालयकालं समाप्य प्रगतिनाम्ना आशुगरेलयानेन गन्तुकामः कोऽपि मासचीटिकापत्रधारी नित्यगामी यात्रिकः स्थानकपालं सकुतूहलं पृच्छति, 'भोः महोदय सम्प्रति एकं ध्वनिप्रसारणं श्रुतं यत् यानं विलम्बेन धावति। त्रिचतुर्दिनेभ्यः आरभ्य अहमनुभवामि यदेतद् यानं प्रत्यहं विलम्बेनैव धावति तदपि वर्धमानेन विलम्बेन। किं कारणं तस्य?'**

**एतं नित्ययात्रिकम् इति जानन् स स्थानकपालः मन्दं विहस्य मधुरया गिरा वदति, 'भोः महोदय तस्य कारणं यानस्य नाम्नि एव वर्तते ।'**

अनुवाद – **प्रगति**

'प्रगति' या नावाच्या जलद गाडीने रोज जाणारा महिन्याचा पास असणारा एक

प्रवासी स्टेशन मास्तरांना कुतूहल म्हणून विचारतो, 'अहो महाशय, नुकतीच एक घोषणा (अनाऊन्समेंट) ऐकली की गाडी उशीरा धावत आहे. तीन चार दिवसांपासून मी पहातोय की, ही गाडी दररोज उशीराने धावत आहे व ते सुद्धा वाढत्या वेळेने. याचे कारण काय?'

या रोजच्या प्रवाशाला ओळखणारा स्टेशन मास्तर किंचित हसून गोड शब्दात म्हणतो, 'अहो सज्जन त्याचे कारण गाडीच्या नावातच आहे. '

## २७. विवेकशीलः पुरुषः

**अथैकदा वस्त्रं प्रक्षालयन्ती काचित् सेविका स्वामिनीं पृच्छति, 'भोः स्वामिनि अहं किञ्चिदाश्चर्यं भवतीं पृच्छेयम् वा? मा कोपं करोतु । क्षमां याचे ।' विशालमनाः स्वामिनी ब्रवीति, 'अयि सेविके, ब्रूहि, ब्रूहि, नाहं कोपयिष्यामि, चिन्तां मा कुरु ।' सेविका वदति, 'शृणोतु तर्हि, अहमद्य भवत्पतेः वस्त्रकोषे केशमार्जनीमेकां प्राप्तवती । भवत्पतिः तु खल्वाटः (केशहीनः) वर्तते।'**

**स्वामिनी तां ब्रवीति, 'अयि सेविके, यत् त्वं पृच्छसि तत् सत्यमेव। एतद् तव सूक्ष्मावलोकनं प्रशंसनीयं खलु । मम पतिः स्वभावेन् विवेकशीलो वर्तते। त्वं जानासि यत् कार्यालयं गन्तुकामः स लोकल इति लोहपथगामिन्या प्रतिदिनं यात्रां करोति। यात्रिकाणां सम्मर्दवशात्, स याने आतिष्ठन् एव उच्चस्थं लोहवलयं हस्तेन धृत्वा यात्रां करोति। क्वचित् अकार्यक्षमस्य व्यजनस्य जाले केशमार्जनीं नीत्वा तस्याः साहाय्येन व्यजनस्य पट्टिकां परिभ्राम्य तद् व्यजनं कार्यशीलं करोति ।'**

अनुवाद – **विवेक्शीलःपुरुषः**

एकदा एक कपडे धुणारी बाई मालकिणीस विचारते, 'मालकीणबाई, मी काही अजब गोष्ट तुम्हाला विचारु का? रागावू नका, मी क्षमा मागते.' मालकीण मोठ्या मनाची होती, 'अग सांग, सांग, मी बिलकूल रागावणार नाही. तू काळजी करु नकोस.'

बाई म्हणते, 'मग ऐका तर. आज मला आपल्या पतीदेवांच्या खिशात एक कंगवा मिळाला. आपले मालकांना तर टक्कल आहे.'

मालकीण तिला म्हणते, 'अगं बाई तू जे म्हणतेस ते खरंच आहे. तुझा हा सूक्ष्मपणा खरोखरीच प्रशंसनीय आहे. माझे पती स्वभावाने विचारी आहेत. तुला माहीत आहे की, ते त्यांचे कामावर दररोज लोकल गाडीने जातात. गर्दीमुळे ते डब्यात उभे राहूनच वरच्या लोखंडी कडीस धरुन प्रवास करतात. कधीकधी न चालणाऱ्या पंख्याच्या जाळीत कंगवा नेऊन त्याच्या साहाय्याने पंख्याचे पाते फिरते करुन त्यास चालू करावा लागतो.

## २८. द्वारघण्टिका

**अथैकदा सायङ्काले कार्यकालं समाप्य गृहं निवर्तमानः कश्चित् सज्जनः विद्युदुपकरणानां वस्तुविक्रयविपणिं गत्वा तत्रस्थं स्वामिनं पृच्छति, 'भोः महोदय गतसप्ताहे भवद्विपण्यामहं मम सदनिकास्थितां द्वारघटिकां द्रष्टुं कञ्चित् विद्युत्कलायन्त्रज्ञं प्रेषयितुं विज्ञप्तिमकरवम् ।'**

**विपणिकस्तं ब्रवीति, 'भोः सज्जन, नाहं भवद्विज्ञप्तिं विस्मृतवान् । अस्माकं तन्त्रज्ञः त्रिचतुर्वारं भवद्गृहं गत्वा प्रत्यागतोऽस्ति। अन्ततः स्वयमहं सदनिकाद्वारे विंशतिनिमेषान् यावत् स्थित्वा अद्यैव प्रत्यागतोऽस्मि। द्वारघण्टिकाप्रचोदकमहं वारं वारं मृदितवान् किन्तु द्वारमपाकर्तुं न कोऽपि आगतः मन्ये दूरदर्शनप्रेक्षणे रताः स्युः सर्वे । अहो, अस्माकं सविधे कुतोऽस्ति इयान् समयः ज्ञायते वा?'**

अनुवाद – **दारावरील घंटी**

अनुवाद : एका सायंकाळी कार्यालयीन कामकाज संपवून घरी परतत असता एक सद्गृहस्थ विजेची उपकरणे विकणाऱ्या दुकानात जाऊन तेथील मालकास विचारतो, 'अहो महाशय, मी मागील आठवड्यात आपले दुकानात माझ्या सदनिकेच्या दारावरील घंटा पाहणेसाठी कोणीतरी वायरमन पाठविण्याची विनंती केली आहे.'

दुकानदार त्यांना म्हणतो, 'आपण केलेली विनंती मी विसरलो नाही. मात्र आमचा

वायरमन तीन-चार वेळा आपले सदनिकेत जाऊन आला. शेवटी मी स्वतः सदनिकेच्या दारात २० मिनिटे पर्यंत उभा राहून आजच मी तेथून परत आलो आहे. बेलचे बटन मी वारंवार दाबले. परंतु दार उघडण्यासाठी कोणीही आला नाही. सर्वजण दूरदर्शन पाहण्यात मग्न असावेत. अहो, आमचेकडे इतका वेळ कोठे आहे? समजले का?

## २९. क्षुधितो यात्रिकः

**अथैकदा रेलयानेन यात्रां कुर्वन् कोऽपि यात्रिकः कस्मिंश्चित् स्थानके कमपि भोज्यवस्तुविक्रेतारं द्रष्टुं यानस्य द्वारे द्वारदण्डौ कराभ्याम् धृत्वा अतिष्ठित् । किन्तु वेदिकायां स न कमपि भ्रमन्तं विक्रेतारं दृष्टवान् । अत्रान्तरे तस्य समीपमागच्छन्तं जलं ददानमेकं बालकमाहूय स तं ब्रवीति, 'वत्स अहम् क्षुधितोऽस्मि द्वौ गोलालुवटकौ क्रीत्वा आनय, तदर्थं चत्वारि रूप्यकाणि गृहाण । त्वमपि त्वदर्थं द्वौ वटकौ क्रीणीहि । तन्निमित्तमपि अन्यानि चत्वारि रूप्यकाणि गृहाण ।'**

**रेलयाने मन्दं चलति सति सवेगं धावन् बालकः यानस्य समान्तरं धावित्वा सज्जनं ब्रवीति, 'भोः महोदय खाद्यविक्रयविपण्यां केवलं द्वौ वटकौ स्तः। भवतः चत्वारि रूप्यकाणि प्रतिगृह्णातु नमस्ते ।'**

अनुवाद – **भुकेलेला प्रवासी**

एकदा रेल्वेने प्रवास करणारा एक प्रवासी खाद्यपदार्थ विकणाऱ्यास पाहण्यासाठी डब्याच्या दारात दरवाजाच्या दोन्ही दांड्या हातात पकडून उभा होता. परंतु प्लॅटफॉर्मवर कोणीही खाद्यवस्तू विकणारा फेरीवाला त्याला दिसला नाही. इतक्यात जवळ येत असलेल्या पाणी देणाऱ्या एका मुलास हाक मारुन त्यास म्हणतो, 'अरे बाळा मला फार भूक लागली आहे. दोन बटाटेवडे विकत आण. त्यासाठी हे चार रुपये घे, तू सुद्धा तुझ्यासाठी दोन वडे विकत घे. त्यासाठी पण दुसरे चार रुपये घे.'

रेल्वे गाडी हळूहळू सुरु झाली असता डब्याला समांतर जोरात धावत येणारा तो मुलगा सद्गृहस्थास म्हणतो, 'अहो महोदय, स्टॉलवर केवळ दोनच वडे होते, घ्या हे आपले चार रुपये परत. नमस्कार!'

# ३०. रोगपरीक्षा

**अथैकदा कोऽपि उदरपीडया त्रस्तः रुग्णः कश्चित् रुग्णालयं सम्प्राप्तः। तत्रस्थमुत्पीठमुपविश्य तस्य क्रमाङ्कस्य प्रतीक्षामकरोत् च। अचिरात् सेविकायाः सङ्केतानुसारं स चिकित्सककोष्ठं प्राविशत् । चिकित्सकस्तं परीक्ष्य तं ब्रवीति, 'भोः सज्जन न मया सम्यक् परीक्ष्यते भवदनारोग्यं, मन्ये मत्ततावशात् स्यात् ।' रुग्णस्तं ब्रवीति, 'भोः चिकित्सकवर गृह्णातु मम दूरध्वनिक्रमाङ्कमेतम् । मत्ततायामपगतायां मामाह्वयतु भवान् ।'**

अनुवाद – **रोगपरीक्षा**

पोटदुखीने त्रस्त झालेला एक रुग्ण दवाखान्यात गेला. तेथील बाकावर बसून आपला नंबर येण्याची वाट पहात राहिला.थोड्याच वेळात तेथील सेविकेच्या सांगण्यावरुन तो डॉक्टरांच्या खोलीत शिरला. डॉक्टर त्याला तपासून म्हणतात, 'अहो मला आपली नीट परीक्षा होत नाही. बहुधा नशेमुळे असेल.' इतक्यात रोगी त्याला म्हणतो, 'डॉक्टरसाहेब हा घ्या माझा टेलिफोन नंबर, नशा उतरल्यावर मला बोलवा.'

# ३१. ध्वनिमुद्रणयन्त्रम्

**अथैकदा काचित् षड्वर्षीया बाला प्रतिवेशिनं पितृवयस्यं पृच्छति, 'भोः तात भवान् भवतः ध्वनिमुद्रणयन्त्रमद्य रात्रौ अस्मभ्यं दास्यति वा?' सज्जनो वदति, 'आम्, हे बाले सायङ्काले अत्रागत्य गृहाण, किन्तु मार्गे मा पातय तत् , सावधानेन चेतसा नय। युष्मद्गृहे अतिथयः आगमिष्यन्ति वा?' बाला ब्रवीति, 'नाहं जानामि तथापि प्रगाढां निद्रामनुभवतां सुखेन अस्माकं रजनी प्रयास्यति इत्युक्तवान् मे तातः।'**

अनुवाद – **ध्वनिमुद्रणयंत्र**

एकदा एक सहा वर्षाची मुलगी शेजारी राहणाऱ्या तिच्या वडिलांच्या मित्राला विचारले,'अहो काका आज आपण आपले ध्वनिमुद्रणयंत्र (टेप रेकॉर्डर) आम्हास द्याल का?' ते सद्गृहस्थ म्हणतात, 'होय बाळे, आज संध्याकाळी येथे येऊन घे हो! परंतु

रस्त्यात पाडू नकोस हो. अगदी सांभाळून ने. तुमच्या घरी कोणी पाहुणे यावयाचे आह काय? ' मुलगी म्हणते, 'ते काही मला माहिती नाही. परंतु माझे वडील म्हणतात, आपली आजची रात्र सुखाने झोपेत जाईल.'

## ३२. प्रभूतं भोजनम्

**कश्चित् भृत्यः विपणिकं ब्रवीति, 'भोः श्रेष्ठिन् दिवसत्रयादारभ्य अहं क्षुधितोऽस्मि। न मे शक्तिः। कृपया पञ्चरूप्यकाणि ददातु मह्यम् भवान् , येन ममोदरपूर्ण प्रभूतं भोजनं भवेत् ।' विपणिकस्तं सपदि पृच्छति, ' रे किङ्कर, अहं तुभ्यं सार्धपञ्चरूप्यकाणि ददामि किन्तु कथय, कस्मिन् भोजनालये पञ्चरूप्यकाणां विनिमयात् उदरपूर्णं प्रभूतं भोजनं प्राप्यते ।'**

अनुवाद – पोटभर जेवण

एक नोकर दुकानदारास विचारतो, 'मालक मी तीन दिवसांपासून भुकेलेला आहे. माझ्यात आज बिलकूल ताकद नाही. मेहेरबानी करुन मला फक्त पाच रुपये द्या. त्यामुळे माझे पोटभर जेवण होईल.' दुकानदार त्याला लगेचच विचारतो, ''अरे, अरे, तुला मी साडेपाच रुपये देतो. परंतु अगोदर मला सांग, कोणत्या खाणावळीत पाच रुपयामध्ये पोटभर जेवण मिळते?'

## ३३. वञ्चितो धनिकः

**उच्चन्यायालयं गन्तुकामः दूरादागतः कोऽपि धनिकः निशायात्रां समाप्य किञ्चित् स्थानकं रेलयानादवातरत् । प्रतीक्षालये मुखमार्जनं, स्नानादिकं विधिं कृत्वा धौतवस्त्राणि परिधाय, चायविक्रयशालायां चायं पीत्वा स्थानकाद् बहिरागत्य रिक्षायानेन उच्चन्यायालयमार्गेण प्रस्थितः। रिक्शाचालकस्तं नगरवैभवं श्रावयित्वा अप्रीणात् । अर्धघण्टां यावत् भ्रामयित्वा स तं उच्चन्यायालयद्वारसम्मुखमानीतवान् ।**

**समये समये घण्टानादं शृण्वन् धनिकः भोजनावकाशे पीठे उपविष्टं कमपि सज्जनं वदति, 'भोः सज्जन, न्यायालये वारं वारं घण्टानादः किमर्थं**

**भवति? पार्श्वे मन्दिरमस्ति वा? सज्जनो वदति, पार्श्वे तु रेलस्थानकं वर्तते न मन्दिरम् ।'**

अनुवाद – **फसलेला श्रीमंत**

उच्च न्यायालयात जाण्यासाठी एक श्रीमंत माणूस रात्रीचा प्रवास संपवून एका रेल्वे स्टेशनवर उतरला. वेटिंगरुममधये मुखमार्जन स्नान वगैरे विधी उरकून धुतलेले कपडे घालून तसेच चहाच्या टपरीत चहा घेऊन स्टेशनचे बाहेर आला व रिक्षेने उच्च न्यायालयाकडे जाणाऱ्या रस्त्याने निघाला. रिक्षाचालक, त्यास शहरातील वर्णने ऐकवून खूष ठेवीत होता. रिक्षाचालकाने त्यास अर्धा तास फिरवून उच्च न्यायालयाचे दारासमोर आणले. वेळोवेळी घंटानाद ऐकून त्याने दुपारचे भोजन सुट्टीत बाकावर बसलेल्या एका सद्गृहस्थास विचारले, अहो न्यायालयात सारखा सारखा घंटेचा आवाज कशासाठी होतो. शेजारी देऊळ आहे का? सदगृहस्थ त्यास म्हणतो, 'अहो शेजारी तर रेल्वे स्टेशन आहे, मंदिर नव्हे.'

## ३४. कम्पमाना पेटिका

**अथैकदा रेलयानेन यात्रां कुर्वती काचिल्ललना तस्याः सम्मुखासनस्थमन्यं यात्रिकं वदति, भोः सज्जन, 'ईषद् उपरि पश्यतु, तत्र स्थापिता स्थूला लोहपेटिका यानस्य सवेगं धावनेन कथं कम्पते। मन्ये भवदीयैव वर्तते सा। कृपया तमुद्धृत्य अधस्तले स्थापयतु भवान् । हस्ते धृतं प्रवासवर्णनं कियद्रम्यम् । किन्तु चिन्तावशात् वाचने नाहमेकवृत्तिर्भवामि।' यात्रिकः सविनयं ललनां ब्रवीति, 'भोः महोदये मा विरमतु वाचनात् , अलं चिन्तया तस्यां निहितानि सर्वाणि वस्तूनि अभञ्जनीयानि ।'**

अनुवाद – **थरथरणारी पेटी**

एकदा रेल्वेने प्रवास करणारी एक महिला तिच्या समोरच्या बाकावर बसलेल्या एका प्रवाशास म्हणते, 'अहो सद्गृहस्थ जरा वर पहा. तेथे ठेवलेली जाडजूड लोखंडी पेटी रेल्वेच्या वेगाने कशी थरथरत आहे? मला वाटते आपलीच आहे ती. कृपा करुन तिला तेथून उचलून खाली ठेवावी. अहो हातातील हे प्रवासवर्णनाचे पुस्तक किती छान

आहे, परंतु काळजीमुळे वाचनात माझे लक्ष लागत नाही.' प्रवासी त्या महिलेस आदराने सांगतो, 'अहो मॅडम, आपण आपले वाचन थांबवू नका आणि काळजीही करु नका. कारण त्या पेटीत ठेवलेल्या वस्तू मोडतोड न होणाऱ्या आहेत.'

## ३५. याचकचिन्तनम्

**कोऽपि सद्गृहस्थो याचकमेकं पृच्छति, ' रे याचक, किमर्थं त्वमत्र वृक्षस्याधो वस्त्रं प्रसार्य प्रतिदिनं याचसे? त्वं न विकलाङ्गो न वा रुग्णः । किमिति त्वमुद्योगं न करोषि?' इति । याचको ब्रूते, 'अहमपि तदेव चिन्तयामि । भवता कृतमुपदेशम् अहं निपुणम् अवगच्छामि । किन्तु इदं स्थानं त्यक्तुं तावत् अवसरमेव न प्राप्नोमि' इति ।**

अनुवाद – **भिकाऱ्याचे चिंतन**

एकदा एक सद्गृहस्थ भिकाऱ्यांस विचारतो, अरे तू दररोज जमिनीवर कापड पसरुन का भीक मागतोस? तू तर रोगीही नाहीस व विकलांगही नाहीस.' भिकारी म्हणतो, 'मी सुद्धा या गोष्टीचाच नेहमी विचार करतो, आपल्या उपदेशामुळे मी खूप समजदार झालो. परंतु ही जागा सोडण्यासाठी मला वेळच मिळत नाही.'

## ३६. विनयशील यात्रिक

**रेलयानं प्रतीक्षमाणः कोऽपि विनयशीलः सज्जनः कञ्चित् स्थानकपालं पृच्छति, 'भोः महोदय एतस्मिन् पीठे उपविश्य धूम्रपानं कुर्याम् वा। तदर्थं कामयेऽहं सम्प्रति।' 'नहि, नहि' स्थानकपालो वदति, 'सार्वलौकिकस्थाने धूम्रपानं निषिद्धं, समीपस्थं फलकं न दृष्टवान् वा? '**

**सज्जनः पुनर्ब्रवीति, 'भोः अधिकारिन् पीठं परितो बहवः तमाखुनालीखण्डाः विकीर्णाः दृश्यन्तेऽत्र पश्यतु भवान् ।' 'अहो, एते तु पृच्छां न कुर्वाणानाम् । ज्ञातं वा', स्थानकपालो वदति ।**

अनुवाद – **विनयशील यात्रिक**

रेल्वेगाडीची वाट पहाणारा एक विनयशील पुरुष एका स्टेशनमास्तरांना विचारतो,

'अहो महाशय, या बाकावर बसून मी धूम्रपान करु का? कारण मला सिगारेट ओढण्याची तीव्र इच्छा झाली आहे.' स्टेशनमास्तर म्हणतो, 'नाही हो नाही. सार्वजनिक ठिकाणी धूम्रपान निषिद्ध आहे. जवळचा तो फलक आपल्याला दिसला नाही का?'

तो सज्जन पुन्हा म्हणतो, 'अहो साहेब बाकांच्या सभोवती विड्यांची अनेक थोटके येथे पसरलेली दिसत आहेत. जरा बघा ना बघा.' 'अहो ही थोटके तर सिगारेट ओढू का हे न विचारणाऱ्यांची आहेत समजले का?' स्टेशनमास्तर म्हणाले.

## ३७. रुचिकरं मिश्रणम्

**कश्चित् सज्जनः किञ्चिदुपहारगृहं प्रविश्य तत्रस्थं भृत्यम् एकां स्थालीं मिश्रणमानेतुमादिष्टवान् । किञ्चित् भुक्त्वा स भृत्यमवदत् , 'भोः सेवक अद्यतनं मिश्रणं रसहीनं वर्तते, अस्य रुचिं पश्यतु। ह्यस्तनं मिश्रणं रुचिकरमासीत् अतोऽहं अद्यात्र पुनरागतोऽस्मि।' भृत्यः ब्रवीति, 'भोः महोदय, मैवं ब्रूहि, कृपया अपमतमपाकरोतु भवान् , एतद् मिश्रणं तु ह्यस्तनमेव।'**

अनुवाद – **चविष्ट मिसळ**

एक सद्गृहस्थ एका हॉटेलमध्ये जाऊन तेथील नोकराकडून एक प्लेट मिसळ मागवितो. थोडीशी खावून तो नोकरास म्हणतो, 'अरे आजची मिसळ बेचव आहे. तिची जरा चव तर बघ. कालची मिसळ चविष्ट होती. म्हणून तर मी येथे आज पुन्हा आलो आहे.' नोकर म्हणतो, 'असे म्हणू नका हो. कृपा करुन गैरसमज दूर करा. अहो ही तर कालचीच आहे.'

## ३८. लीलया नियुक्तिः

**मौखिकपरीक्षार्थमागतं कमपि पदान्वेषिणं युवानं परीक्षकः पृच्छति, 'भोः सज्जन तवावेदनपत्रात् दृश्यते यद् एकस्मिन्नेव मासे चतुर्षु स्थानेषु त्वं किङ्करत्वं कृतवानसि ।' परीक्षार्थी सधैर्यं ब्रवीति, 'भोः महोदय भवदालोचनं सम्यगेव । यदपि भवद्भिः ज्ञातं स्याद् यत् स्थाने स्थाने ममनियुक्तिः लीलया**

**भवति ।'**

अनुवाद – **सहज नेमणूक**

नोकरीच्या शोधात असलेल्या तोंडी परीक्षेसाठी आलेल्या एका तरुणास परीक्षक विचारतात, 'अहो सद्गृहस्थ तुमच्या अर्जावरुन असे दिसते की, तुम्ही एकाच महिन्यात चार ठिकाणी नोकरी केलेली आहे.' उमेदवार धैयाने म्हणाला, 'अहो महोदय, आपण योग्यच जाणलेत आणि आपले लक्षात आलेच असेल की, ठिकठिकाणी माझी नेमणूक अगदी सहज होत आहे.'

## ३९. दुग्धालयः

**एकस्मिन् दिने दुग्धमानेतुमिच्छन् कोऽपि सज्जनः कञ्चित् दुग्धालयं सम्प्राप्तः। तत्रस्थं भृत्यं पृच्छति, ' रे सेवक अहमनुभवामि यत् सर्वत्र मूल्यं वर्धितं, किन्तु एतस्मिन् दुग्धविक्रयगृहे मूल्यवृद्धिर्नाभवत् । किं कारणम्?'**

**सेवको वदति, 'भोः सज्जन यद्भवान् वदति, तत् सत्यमेव । अस्माकं स्वामी ग्राहकाणां दुःखं सम्यग् जानाति । स ग्राहकाणां हिताय एव सदैव प्रयतते । दारिद्र्यरेखायाः अधो वर्तमाना अपि अस्माकं नित्यग्राहकाः। अन्यैः स्वामिभिः मूल्यवर्धनं कृतम् , अस्माकं स्वामिना तु जलवर्धनम् इति आकूतम्।'**

अनुवाद – **दुग्धालय**

एकदा दूध आणण्यासाठी एक सद्गृहस्थ दूध डेअरीत आला. तेथील नोकरास विचारतो, 'अरे मी पाहतोय की, सगळीकडे दुधाचे भाव वाढले आहेत. मात्र या दुकानात भाववाढ झाली नाही. त्याचे काय कारण आहे?'

नोकर म्हणतो, 'अहो आपण जे सांगत आहात ते खरेच आहे. आमच्या मालकाला ग्राहकांच्या दुःखाची जाणीव आहे. त्यांचा गिऱ्हाईकांच्या हितासाठीच नेहमी प्रयत्न असतो. दारिद्र्यरेषेखाली असणारे सुद्धा आमचे ग्राहक आहेत. अहो दुसऱ्या मालकांनी भाव वाढविले आमच्या मालकाने पाणी वाढविले इतकेच.

# ४०. यानानि मन्दं चालयतु

**कस्मिंश्चिन्नगरे कोऽपि नवागतः सकुतूहलं, हस्तेन यानानि सूचयन्तं गणवेषधारिणं चतुष्पथनियन्त्रकं भटं पृच्छति, 'भोः भटवर स्थाने स्थाने मन्दं चालयन्तु यानानि, एतादृशानि फलकानि प्रदर्शितानि दृश्यन्ते । फलकानां किं प्रयोजनम् ?' भटः वदति, 'भोः सज्जन भवतः अवलोकनं सम्यगेव । तादृशानि फलकानि स्थाने स्थाने स्थापितानि यतः एतस्मिन् विभागे नैकोऽपि रुग्णालयः।'**

अनुवाद – **वाहने सावकाश चालवा**

एका शहरात नव्यानेच आलेला एक इसम हाताच्या खुणांनी वाहनांना मार्गदर्शन करणाऱ्या एका वाहतूक पोलिसास कुतूहलाने विचारतो, 'अहो पोलीस महाशय, या भागात वाहने सावकाश चालवा असे ठिकठिकाणी फलक लावलेले दिसत आहेत. इतक्या फलकांची काय जरुरी आहे?' पोलीस म्हणतो, 'कारण या भागात एकही दवाखाना नाही.'

# ४१. शीर्षपीडा

**चिकित्सालयमागतः कोऽपि पीवरतनुः खिन्नवदनो रुग्णः चिकित्सकं सविनयमभाषत, 'भोः चिकित्सकवर, अहं शीर्षपीडामनुभवामि। दुःखं न सह्यते। केनाप्युपायेन मां त्रायतां भवान् ।' सम्यक् परीक्ष्य चिकित्सकस्तमाह, 'भोः सज्जन, रोगस्य विषये भवान् वृथा चिन्तां मा करोतु । अहं भवते द्वे गुलिके ददामि। निशायां शय्यायां स्वपनात् प्रागेकां गुलिकां जलेन सह ग्रसताम् । प्रत्यूषे भवान् जागर्ति चेत् , द्वितीयां तथैव ग्रसेत।'**

अनुवाद – **डोकेदुखी**

दवाखान्यात एक स्थूल शरीराचा परंतु अतिशय निराश असलेला रोगी नम्रपणे डॉक्टरांना विचारतो, 'अहो साहेब माझे डोके फार दुखत आहे. मला ते सहन होत नाही. काहीही करुन मला वाचवा.' डॉक्टरांनी त्याची व्यवस्थित तपासणी करुन तो

रोग्यास म्हणतो, 'अहो आपण आपल्या दुखण्याबाबत अजिबात काळजी करु नका.आपल्याला मी दोन गोळ्या देतो. रात्री झोपण्यापूर्वी एक गोळी पाण्याबरोबर घ्या. सकाळी जाग आली तर दुसरी गोळी तशीच घ्या.

# ४२. कुञ्चिका

**कस्मिंश्चित् नगरे कोऽपि सज्जनो निवसति स्म। तेन एका दासी गृहकार्यार्थं नियुक्ताऽसीत् । सा पात्रवस्त्रप्रक्षालनादि कार्यं महता विश्वासेन करोति। अथैकदा सा स्वामिनीं पृच्छति, 'भोः स्वामिनि, अहं भवत्याः गृहे नैकेभ्यः वर्षेभ्यः सेवां करोमि। किन्तु भवती मयि न एतावत् पर्यन्तं विश्वसिति।' स्वामिनी ब्रवीति, 'अयि सेविके मा ब्रूहि एवम् । अत्र हि सर्वाः कुञ्चिकाः तालाश्च मुक्ता वर्तन्ते।' सेविका आह, 'भवत्याः भाषणं सत्यमेव। तथापि कुञ्चिकासमूहे कोषपेटिकायाः कुञ्चिका न दृश्यते।'**

अनुवाद –

**किल्ली**

एका गावात एक सद्गृहस्थ रहात असत. त्यांनी एका कामवालीस घरकामासाठी ठेवले होते. ती धुणीभांडी इत्यादी कामे अत्यंत विश्वासपूर्वक करीत असे. एकदा ती मालकिणीस विचारते, 'अहो मालकीणबाई, मी आपलेकडे अनेक वर्षांपासून काम करीत आहे. परंतु माझ्यावर आपला अजिबात विश्वास नाही.' मालकीण म्हणते, 'अगं तू असे बोलू नकोस. येथे तर सर्वत्र कुलुपे व किल्ल्या मोकळ्या पडलेल्या आहेत.' सेविका म्हणते, 'आपण म्हणता ते खरे आहे. मात्र किल्ल्यांच्या जुडग्यात तिजोरीची चावी दिसत नाही.'

# ४३. आधारपत्रम्

**कस्मिंश्चिन्नगरे सदनिकायां वृद्धो निवसति। एकस्मिन् दिने आधारपत्राणां निरीक्षणार्थं कश्चित् निरीक्षकः आगतः। स वृद्धं पृच्छति, 'भोः महोदय, कथम् अद्ययावत् आधारपत्रविहिनोऽस्ति भवान्? एतस्मिन् गृहसङ्कुले प्रायः सर्वेऽपि पत्रमेतद् धारयन्ति।'**

**वृद्धो वदति, 'भोः अधिकारिन्, वृत्तपत्राणि पठित्वा अहमाधारपत्रविषये सम्यग् जानामि, किन्तु तत्प्राप्त्यर्थं न मे कोऽप्याधारः।'**

**वृद्धो निवृत्तसंस्कृताध्यापक आसीत् । संस्कृतलेखनवाचने बहुधा मग्न आसीत् । तं परितः विकीर्णानि पुस्तकानि दृष्ट्वा निरीक्षकमहोदयः तमभिवाद्य सविनयं तं संस्कृतं श्रावयितुं प्रार्थयते। वृद्धः किञ्चिद्विहस्य तमित्थं श्रावयति।**

**आधारपत्रादि कथं लभेय । न मे तदर्थं सदने सहायः।।**
**प्रयोजनं किं खलु मेऽस्ति तेन । दिनानि शेषाणि यतः कियन्ति ।।**

अनुवाद – **आधारपत्र**

एका सदनिकेत एक वृद्ध रहात होता. एकदा आधारपत्रांच्या पहाणीसाठी एक निरीक्षक आला. तो वृद्धास विचारतो, अहो महाशय, आजपर्यंत तुम्ही आधारपत्राशिवाय कसे आहात? या सोसायटीतील बहुतेक सर्वांकडे आधारकार्डे आहेत. वृद्ध म्हणतो, वर्तमानपत्रे वाचून मला आधारकार्डांबाबत चांगले समजले आहे. परंतु ते मिळविण्यासाठी मला कोणाचाही आधार नाही.

वृद्ध गृहस्थ हे संस्कृत विषयाचे सेवानिवृत्त अध्यापक होते. संस्कृत वाचनात व लिहिण्यात बऱ्याचदा ते मग्न असत. त्याचे अवतीभवती पसरलेली पुस्तके पाहून निरीक्षक त्यांना आदरपूर्वक नमस्कार करुन त्यांना संस्कृत ऐकविण्याची विनंती करतात. वृद्ध अध्यापक थोडेसे हसून त्याला खालीलप्रमाणे ऐकवतात.

अहो आधारकार्ड मला कसे मिळेल? त्यासाठी माझ्या घरात कोणी मदतनीस नाही. आणि खरंच, त्याची आज मला काय आवश्यकता आहे? कारण माझे आता किती दिवस उरलेत?

## ४४. निद्रानाशः

**वर्षद्वयादाराभ्य अनिद्रापीडात्रस्तः कोऽपि सज्जनो भविष्यवेत्तारं पृच्छति, 'भोः गुरुवर अहं निद्रानाशेन पीडितोऽस्मि। पश्यतु ममैतां जन्मपत्रिकाम् । नैकैः चिकित्सकैर्दत्तौषधैर्न मे कोऽपि लाभोऽभवत् । जीवने न मे कापि चिन्ता। केवलं निद्रानाशो मां त्रसति तीव्रम् । कृपया कथयतु भवान् कमपि**

**उपायम् ।'**

**तस्य जन्मपत्रिकां सम्यगवलोक्य शुक्लशीलासाहाय्येन अभ्यासपूर्वं किञ्चित् गणितं लिखित्वा भविष्यवेत्ता ब्रवीति, 'भोः सज्जन, द्विवर्षकालाभ्यन्तरे भवन्निद्रास्थले परिवर्तनमभूद्वा? यदि तथा स्यात् तर्हि भवान् अद्यारभ्य पूर्वस्थल एव निद्रां करोतु तदनन्तरं द्रक्ष्यामि।'**

**सज्जनो भाषते, 'मम निद्रास्थले परिवर्तनं भूतमिति सत्यम् , किन्तु सम्प्रति पूर्वस्थले शयनमशक्यमेव, यतो वर्षद्वयात् प्रागहं कारागृहे दशवर्षाणि यावत् बन्दिरासम् ।'**

अनुवाद – **निद्रानाश**

दोन वर्षांपासून झोप नसल्याने त्रस्त असलेला एक गृहस्थ ज्योतिषाकडे जातो व म्हणतो, महाराज, माझी ही जन्मपत्रिका पहा. दोन वर्षांपासून मला झोप लागत नाही. अनेक डॉक्टरांकडून निरनिराळी औषधे घेतली. परंतु माझा काहीही फायदा झाला नाही. मला आयुष्यात कोणतीही काळजी नाही. फक्त झोप नसल्यामुळेच मला खूप त्रास होत आहे. आपण काहीतरी उपाय सांगा.

त्याची जन्मपत्रिका पाहून थोड्याशा अभ्यासाने खडूने काहीतरी गणित मांडून ज्योतिषी त्यास म्हणतो, महोदय, हे बघा, दोन वर्षाच्या काळात आपल्या झोपेच्या जागेत बदल झाला आहे काय? तसे असेल तर आपण आजपासून पूर्वीच्या जागेवर झोपण्यास जा. मग पाहीन.

तो गृहस्थ म्हणतो, 'माझ्या झोपेच्या जागेत बदल झाला आहे हे सत्य आहे. परंतु आता पूर्वीच्या जागेवर झोपणे अशक्यच आहे. कारण दोन वर्षांपूर्वी मी तुरुंगात दहा वर्षांपासून कैदी होतो.'

## ४५. उशीरासवः

**अथैकदा कस्यचित्कार्यालयस्याधीक्षकः काञ्चित् महिलालिपिकारां पृच्छति, ''भोः महोदये, उपस्थिति–पुस्तकमवलोक्य अहं मन्ये, यद् अधुना भवती प्रायशः प्रत्यहमेव कार्यालयं विलम्बेनागच्छति । किं कारणम्?'**

**लेखनिका वदति, 'महोदय, भवान् पूर्वतो जानाति यदहं केनचिद् रोगेण पीडिताऽस्मि । अहं विषमचिकित्सानुसारम् औषधानि गृहीतवती । किन्तु अधुना तां चिकित्सापद्धतिं विहाय आयुर्वेदचिकित्सानुसारं, भोज्यौषधं मया सेव्यते ।' अधीक्षकस्तां पृच्छति, 'किं नाम तदौषधस्य?' सा प्रत्युत्तरति, ''*उशीरासवः'' इति.**

* मराठी भाषायाम् 'उशीर' इति पदस्य विलम्ब इत्यर्थो भवति ।

अनुवाद – **उशीरासव**

एकदा एक कार्यालय अधीक्षक, एका महिला लिपिकेस विचारतो, 'अहो मॅडम, उपस्थिती पुस्तिकावरुन असे दिसते की, अलीकडे आपण कार्यालयात बहुधा दररोज उशीरा येत आहात. कशासाठी?' लिपिका म्हणते, 'साहेब, आपणास माहिती आहे की, मी एका रोगाने पीडित आहे. मी ॲलोपथी चिकित्सापद्धतीने आतापर्यंत औषधे घेत होते. मात्र आता ती सोडून मी आयुर्वेदपद्धतीनुसार औषधे घेत आहे.' यावर अधीक्षक तिला विचारतात, 'त्या औषधाचे काय नाव आहे?' 'उशीरासव' त्यामुळे असेल कदाचित.' ती उत्तरते.

## ४६. पृष्ठतः पश्यतु

**एकदा परीक्षास्थले उत्तरपत्रिकां लिखन्नेकः छात्रः मुहुर्मुहुः तस्य पृष्ठतः पश्यति। तस्य एतां कृतिमालोक्य पर्यवेक्षकः शनैः तस्य छात्रस्य समीपमागत्य तं पृच्छति, ' रे भद्र, किमर्थं त्वं वारंवारं तव पृष्ठतः पश्यसि?' छात्रो वदति, 'पश्यतु भवान् एतस्याः प्रश्नपत्रिकायाः तलभागे लिखितमिदम् -- 'पृष्ठतः पश्यतु' इति।**

अनुवाद – **मागे पहा**

एकदा एका परीक्षा हॉलमध्ये उत्तरपत्रिका लिहिण्यास एक विद्यार्थी वारंवार मागे वळून पाहतो. हे पाहून पर्यवेक्षक हळूहळू त्याच्याजवळ जाऊन त्यास विचारतो, 'अरे तू सारखा मागे वळून का पहातोस?' विद्यार्थी म्हणतो, 'आपण या प्रश्नपत्रिकेच्या खाली पहा, हे लिहिले आहे की, 'मागे पहा'.

## ४७. भोजनाय आमन्त्रणम्

**एकः सुशीलपुरुषः स्वमित्रं भोजनार्थमामन्त्रयते। मित्रं तं पृच्छति, 'अयि मदीय प्रिय वयस्य, त्वं मां तव गृहे भोजनार्थं महता प्रेम्णा आह्वयसि। अवश्यम् अहम् आगमिष्यामि। चिन्ता माऽस्तु । किन्तु आदौ मे कथय, किं तव भार्या एतज्जानाति?' सुशीलपुरुषः वदति, 'हे सखे, अद्य प्रभाते हि तव आमन्त्रणविषये सा मया सह हस्ते लगुडं गृहीत्वा उच्चैः कलहं कृतवती।'**

अनुवाद – **भोजनासाठी आमंत्रण**

एकदा एक सद्गृहस्थ आपल्या मित्रास भोजनासाठी घरी येण्याचे आमंत्रण देतो. मित्र त्यास विचारतो, 'अरे मित्रा तू मला घरी मोठ्या प्रेमाने बोलावीत आहेस. मी अवश्य येईन. काळजी करु नको. परंतु तू मला हे सांग की तुझ्या पत्नीस हे माहिती आहे का?' 'अरे मित्रा तुझ्या आमंत्रणाबद्दल तर तिने अगदी हातात काठी घेऊन माझ्याशी आज सकाळीच भांडण केले.'

## ४८. समयसारिणी

**एकदा कस्यचिद् रेलस्थानकस्य विश्रामगृहे केचिद् यात्रिकाः रेलयानानां प्रतीक्षां कुर्वाणाः उपविष्टाः। अत्रान्तरे यात्रानुज्ञापत्राणां निरीक्षणाय गणवेषधारी कोऽपि स्थानकनिरीक्षकः तत्र उपस्थितः। तदा कोऽपि यात्रिकः तं पृच्छति, 'भोः अधिकारिमहाशय, किमर्थं रेलयानानां समयसारिणी प्रदर्शिता भवति? यतो नैकमपि रेलयानं यथासमयं नियतवेलं धावति।'**

**स निरीक्षको न केवलं संस्कृतानुरागी, गुञ्जारवपाठकः च आसीत्, अपि तु संस्कृतकविः अपि अभवत् । प्रत्युत्पन्नमतिः स महाशयः ईषत् हासमुखः शीघ्रं स्वरचितं काव्यं अश्रावयत् –**

**तेषां विलम्बो यदि नास्ति नित्यः। प्रयोजनं किं नु विरामधाम्नः ।**

**अपि च –**

**कियद्विलम्बाद् उपयाति यानं । ज्ञातुं तदर्थं किल सारणीयम् ।।**

**समीपम् आसन्दिकोपविष्टः कश्चित् संस्कृतप्राध्यापकः इदम् उत्तरं निशम्य विस्मयस्य परां काष्ठाम् अगच्छत् । स्वगतं चावदत् , 'धन्यं तद् रेलप्रशासनं यत्र सेवकाः अपि कालिदासवत् काव्यं कर्तुं क्षमाः ।'**

अनुवाद – **वेळापत्रक**

एकदा कोण्या एका रेल्वे स्टेशनच्या विश्रामगृहात काही प्रवासी गाड्यांची वाट पहात होते. इतक्यात एक तिकिट तपासनीस तिकिटे तपासण्यासाठी तेथे आला. त्यावेळी एक यात्रेकरु त्यास विचारतो, 'अहो अधिकारी महोदय, काय हो गाड्यांचे वेळापत्रक कशासाठी लावले आहे? कारण एकही गाडी वेळेवर धावत नाही.'

तो तिकिट तपासनीस केवळ संस्कृत जाणणारा, गुञ्जारव या त्रैमासिकाचा वाचकच नव्हता तर तो संस्कृत कवीही होता. तो हजरजबाबी असून थोडेसे हास्यमुखाने लगेचच स्वरचितकाव्य त्याला ऐकवितो –

'त्यांना (गाड्यांना) नेहमी विलंब होत नसेल तर विश्रांतिगृहांची आवश्यकता काय आहे? शिवाय, गाड्या किती उशीरा धावत आहेत हे समजण्यासाठीच खरोखर वेळापत्रक आहे.'

जवळच्या बाकावर बसलेल्या एका संस्कृत प्राध्यापकांस हे उत्तर ऐकून खूप आश्चर्य वाटले व ते मनाशी म्हणाले धन्य असो त्या रेल्वे खात्याची जेथील नोकरसुद्धा कालिदासाप्रमाणे काव्य करु शकतात.

## ४९. क्व गन्तव्यम्

**कोऽपि वृद्धः रेलस्थानकं गत्वा स्थानकपालं रेलयानानां गमनागमनसमयं पृच्छति। वारंवारं पृष्टः स्थानकपालः ईषत् क्रुद्धः ब्रवीति, 'भो तात किमर्थं सर्वेषाम् यानानाम् समयान् भवान् पृच्छति? केन यानेन, क्व च गन्तव्यं भवता?' वृद्धः ब्रूते 'नाहं किमपि स्थानकं गन्तुमिच्छामि। किन्तु एतादृशान् विस्तीर्णान् रेलमार्गान् अतिक्रम्य पारं गन्तुमिच्छामि।'**

अनुवाद – **कोठे जायचे?**

कोणी एक वृद्ध रेल्वे स्टेशनवर जाऊन रेल्वे स्टेशनमास्तरांना गाड्यांच्या जाण्यायेण्याच्या वेळासंबंधी विचारतो. वारंवार विचारले गेल्यामुळे स्टेशनमास्तर

थोड्याशा रागाने विचारतो, 'अहो काका, तुम्ही सर्वच गाड्याच्या वेळा कशासाठी विचारत आहात? आपणास कोणत्या गाडीने व कोठे जावयाचे आहे?' वृद्ध म्हणतो, 'मला कोणत्याही स्टेशनला जावयाचे नाही, अहो इतके पसरलेले रुळ ओलांडून ते मला पार करुन जाण्याचे आहे ना !'

## ५०. तिस्रः पिपीलिकाः

**मार्गेण भ्रमन्त्यः तिस्रः पिपीलिकाः मार्गमध्ये कानपि शर्करकणान् प्राप्तवत्यः। तासु द्वे पिपीलिके तान् कणान् अभक्षयताम् । एका तु निश्चला स्थिता। ते पिपीलिके तां तिष्ठन्तीं पृष्टवत्यौ, ' किमर्थं त्वं शर्करकणान् न भक्षितवती? किं तवोदरे स्वल्पमपि स्थानं नावर्तत?' सा अब्रवीत् , ' नहि, नहि, अहं तु मधुमेहेन ग्रस्ताऽस्मि।'**

अनुवाद – **तीन मुंग्या**

रस्त्याने भटकणाऱ्या तीन मुंग्यांना वाटेत काही साखरेचे कण मिळाले. त्यापैकी दोन मुग्यांनी ते कण खाल्ले. एक मुंगी मात्र निश्चल थांबून राहिली. त्या दोन मुंग्यांनी त्या थांबलेल्या मुंगीस विचारले, 'तू साखरेचे कण का खाल्ले नाहीस? तुझ्या पोटात थोडीसुद्धा जागा नाही काय?' ती म्हणते, 'नाही नाही, तसे नाही. मला मधुमेह झाला आहे.'

## ५१. जानुवेदना

**अथैकदा एकस्मिन् गृहसङ्कुले वसन्तौ द्वौ वृद्धौ सङ्कुलप्राङ्गणे स्थिते पीठे नित्यं सायङ्काले उपविश्य जल्पनं कुरुतः स्म। एकस्मिन् दिने एकः वृद्धः द्वितीयं सस्नेहं पृच्छति, 'भोः सज्जन अहं बहुभ्यो दिनेभ्यो जानुवेदनेन त्रस्तोऽस्मि। चिकित्सकस्य आदेशात् प्रतिदिनमहं विंशति रूप्यकाणां गुलिकासेवनं मासादारभ्य करोमि, तथापि अद्यतनदिवसपर्यन्तं न मे कोऽपि लाभोऽभवत् ।'**

**सज्जनस्तं वदति, 'भोः मित्रवर, अहं जानामि भवद्व्यथाम् । तदर्थम्**

**अहम् उपायमेकं कथयामि। श्वसतनदिनादारभ्य दश रूप्यकाणामेव गुलिकाः भवान् भक्षयतु येन न कापि हानिर्भवेत् अपितु प्रत्यहं दशरूप्यकाणां लाभो भवेदिति मे मतिः।'**

अनुवाद – **गुडघेदुखी**

गृहनिर्माण संस्थेत राहणारे दोन वृद्ध पटांगणातील बाकावर बसून रोज सायंकाळी गप्पागोष्टी करत बसत असत. एकदा त्यातील एक वृद्ध दुसऱ्यास प्रेमपूर्वक विचारतो, अहो मी फार दिवसांपासून गुडघेदुखीने त्रस्त आहे. डॉक्टरांच्या सांगण्यावरुन मी दररोज वीस रुपये किंमतीच्या गोळ्या एक महिन्यापासून घेत आहे. परंतु आजपर्यंत मला काहीही फायदा झाला नाही.

वृद्ध त्यास म्हणतो, अरे मित्रा मी तुझी व्यथा चांगली समजतो. त्यासाठी मी तुला एक उपाय सांगतो. उद्यापासून तू फक्त दहा रुपये किंमतीच्या गोळ्या खा. त्यामुळे तुझे काहीही नुकसान होणार नाही. परंतु दररोज दहा रुपयांचा फायदाच होईल असे मला वाटते.

## ५२. चिकित्सकस्य शिरःपीडा

**कस्यचित् चिकित्सकस्य मित्रं तं पृच्छति, ' रे वयस्य किमर्थं त्वमधुना सर्वदा चिन्ताग्रस्तो दृश्यसे? का पीडा त्वां त्रसति।' चिकित्सको वदति, 'अहं शिरःपीडया त्रस्तोऽस्मि।' मित्रं ब्रवीति, 'त्वं तु स्वयं चिकित्सकोऽसि। न जानासि औषधानि वा?' चिकित्सकः सखेदं कथयति, 'शृणु , मासादारभ्य मम चिकित्सालयमागताः रुग्णाः सर्वेऽपि शिरःपीडनत्रस्ताः। किं क्रियताम् ?'**

अनुवाद – डॉक्टरची डोके**दुखी**

एकदा एका डॉक्टरास त्याचा मित्र विचारतो, अरे मित्रा तू हल्ली नेहमी काळजीत असलेला का दिसतो? तुला कसली काळजी आहे? डॉक्टर म्हणतात, मी डोकेदुखीने त्रस्त आहे. मित्र म्हणतो, अरे तू तर स्वतःच डॉक्टर आहेस. तुला औषधे माहिती नाहीत का? डॉक्टर महाशय दुःखी अंतःकरणाने म्हणतात, ऐक, एक महिन्यापासून माझ्या दवाखान्यात आलेले सगळे रोगी डोकेदुखीनेच त्रस्त झाले आहेत. काय करावे?

## ५३. नित्यप्रवृत्तिः

**कस्मिंश्चित् कारागृहे कश्चित् रक्षापुरुषः आसीत् । शासनदत्ते निवासगृहे स सकुटुम्बं निवसति स्म। प्रत्यहं भवतः धनव्ययस्य लेखनं दैनन्दिन्यां व्ययपुस्तिकायां लेखनं तस्य नित्यप्रवृत्तिरासीत् । अङ्गणवाडी सेविका इति रूपेण तस्य भार्या नातिदूरस्थिते ग्रामे कार्यं करोति स्म। एकस्मिन्नवकाशे दिने सा पतिं पृच्छति, 'भोः पतिवर, अहं पश्यामि यत् भवतः व्ययपुस्तिकायां चतुर्मासादारभ्य केशकर्तनार्थं कृतव्ययस्य लेखनं न कृतं भवता, विस्मरणाद्वा?'**

**पतिः वदति, 'अयि प्रिये, यद् त्वं वदसि तद् सत्यमेव। कियती चतुराऽसि त्वम् । एतादृशेन सूक्ष्मावलोकनेन ते, मम प्रभूतः सन्तोषः जातः। शृणु , नैतद् विस्मरणीयम् । चतुर्मासपूर्वं कारागृहमागतेषु बन्दिषु एकोऽस्ति नापितो वृत्त्या।'**

अनुवाद – **पडिले वळण**

एका तुरुंगात पहारा करणारा एक पोलीस होता. शासनाने दिलेल्या घरात तो सहकुटुंब रहात होता. दरदिवशी होणाऱ्या खर्चाची नोंदवहीत नोंद करण्याची त्यास सवय होती. जवळच्याच गावात त्याची पत्नी अंगणवाडी सेविका म्हणून नोकरी करीत होती. एकदा सुट्टीच्या काळात ती पतीस विचारते, अहो आपली खर्चाची वही वाचून पाहता असे दिसते की, चार महिन्यांपासून आपण केस कापण्याच्या खर्चाबाबत काहीही नोंद केली नाही. विसरलात म्हणून का?

नवरा म्हणतो, अगं तू जे म्हणतेस ते सत्य आहे. तू किती चतुर आहेस. तुझी ही अगदी सूक्ष्म नजर पाहून मला खूप संतोष वाटतो. तर ऐक, अशी नोंद करण्याचे विसरलेलो नाही. चार महिन्यापूर्वी तुरुंगात आलेल्या कैद्यांमध्ये एक न्हावी आहे.

## ५४. इच्छामरणम्

**कस्मिंश्चित् शुश्रूषागृहे अन्तर्रुग्णविभागस्थः कोऽपि वृद्धरुग्णः चिकित्सकं**

**चिकित्सकं वारं वारं वदति, 'भोः वैद्यवर, अहं नैकैः व्याधिभिः तथा कुटुम्बकलहेनापि नितरां पीडितोऽस्मि। नाहं जीवितुं कामये। कृपया मां मारयतु, पश्चात् नाहं भवन्निन्दां करिष्यामि' (हास्यं)। चिकित्सको वदति, 'महोदय, रुग्णालयाः रुग्णान् मारयितुं न स्थापिताः। भवान् वातुलः इव मा ब्रवीतु ।'**

**अत्रान्तरे तत्रस्थः कोऽपि कक्षापुरुषः वृद्धस्य भाषणं श्रुत्वा नातिदूरं गत्वा चिकित्सकं वदति, 'वृद्धस्य स्थितिमालोक्य तदर्थम् अहमेकमुपायं कथयामि। ऊर्ध्वतले सप्तक्रमाङ्कायां खट्वायां वृद्धः स्थापनीयः यतः तत्रस्थो रुग्णः षट्सप्तदिनावधावेव दिवं प्रयातीति खट्वायाः इतिहासः।'**

अनुवाद – इच्छामरण

एका हॉस्पिटलमध्ये आंतररुग्ण विभागातील एक वृद्ध रोगी डॉक्टरांना वारंवार सांगतो, अहो डॉक्टरसाहेब मी अनेक व्याधींनी तसेच आमचे कौटुंबिक भांडणांमुळे त्रस्त झालो आहे. मला जगण्याची आता इच्छा नाही. कृपा करुन मला मारा. नंतर मी आपणास दोष देणार नाही (हशा). डॉक्टर म्हणतात, अहो महाशय, रुग्णालये रोग्यांना मारण्यासाठी स्थापन केलेली नसतात. आपण वेड्यासारखे बोलू नका.

इतक्यात तेथील एक वॉर्डबॉय वृद्धाचे संभाषण ऐकून जवळच जाऊन डॉक्टरांना म्हणतो, डॉक्टरसाहेब या वृद्धाची परिस्थिती पाहून त्यासाठी मी एक उपाय सांगतो. वरच्या मजल्यावरील सात नंबरच्या कॉटवर या वृद्धास ठेवावे. कारण सदर कॉटवरील रोगी सहा–सात दिवसातच मरण पावतो असा या कॉटचा इतिहास आहे.

## ५५. इष्टसिद्धिः

**एकस्यां सदनिकायां निवसन् कोऽपि मध्यवयाः सज्जनः प्रतिवेशिनः पुत्रं पृच्छति, ' रे युवन् , अहं पश्यामि यत् तव षट्सप्ताः सखायः सन्ति तेषु एकः सखा पीवरतनुः मन्दगतिः च वर्तते। अन्ये सखायः सामान्यप्रकृतयः वर्तन्ते। कथमेतद् वैषम्यम्? अपि युष्मभ्यं रोचते? '**

**युवा वदति, 'भोः सज्जन यद् भवान् वदति तद् सत्यमेव। तद्विषये शृणोतु भवान् । अस्माकम् एष सखा धनिकस्य पुत्रः वर्तते। तदेव अस्माकं वस्तुतः महन्मित्रम् यतः यदा वयम् उपहारगृहात् बहिर्गच्छामः तदा तस्य स्थूलत्वात् , शनैः चलनात् च स सर्वेषाम् अन्ते बहिरागच्छति येन अस्माकं इष्टसिद्धिर्भवति।' (खाद्यस्य शुल्कं स एव पूरयति) सज्जनः उच्चैः हसति।**

अनुवाद – **इच्छापूर्ती**

एकदा एका सदनिकेत राहणारे मध्यमवयाचे एक सद्गृहस्थ शेजारी राहणाऱ्याच्या मुलास विचारतात, अरे मी असे पाहतो की, तुला सहा सात मित्र आहेत. त्यापैकी एक मित्र जाडजूड व हळू चालणारा आहे. दुसरे मित्र मात्र सर्वसाधारण तब्येतीचे आहे. ही विषमता कशी? तुला हे आवडते का?

तो तरुण म्हणतो, अहो सज्जन, आपण जे म्हणता ते खरेच आहे. त्याविषयी ऐका. आमचा हा मित्र एका श्रीमंताचा मुलगा आहे. आणि तोच आमचा खराखुरा मित्र आहे. कारण आम्ही हॉटेलातून जेव्हा बाहेर जातो त्यावेळी त्याच्या जाडजुडपणामुळे तसेच हळू चालीने तो सर्वांच्या शेवटी बाहेर येतो. त्यामुळे आमची इच्छा पूर्ण होते (हॉटेलचे बिल तोच भरतो). तो सज्जन जोराने हसतो.

## ५६. आवाहनम्

**अथैकदा नवनिर्वाचितः गृहमन्त्रिमहोदयः गृहविभागसम्बद्धान् विषयाननुसृत्य सूचनाप्रेषणार्थं प्रसारमाध्यमद्वारा जनान् आह्वयति । नैके जनाः विविधाः सूचनाः प्रेषितवन्तः। तेषु एकः सज्जनः सूचनापत्रे लिखितवान् यत् सर्वकारीयकर्मकारिणां कृते तथा मन्त्रिवराणां कृते शीतस्थले कारागृहं निर्मातव्यम् ।**

अनुवाद – **आवाहन**

एकदा नव्याने निवडून आलेले गृहमंत्री प्रसारमाध्यमांतून गृहखात्याचे विषयावर सूचना करण्याचे लोकांना आवाहन करतात. अनेकजण निरनिराळ्या सूचना पाठवितात. त्यांचेपैकी एक सद्गृहस्थ पत्राने अशी सूचना करतो की , सरकारी नोकरांसाठी व

मंत्र्यांसाठी थंड हवेच्या ठिकाणी तुरुंग बांधावा.

## ५७. अक्षरज्ञः

**अथैकदा औषधानि क्रेतुमिच्छन् कश्चित् ग्राहकः औषधालयं गत्वा तत्रस्थं भृत्यमेकं सकुतूहलं पृच्छति, 'भोः सज्जन, अहं ज्ञातुमिच्छामि यत् भवद्विपण्याम् एकः अतिवृद्धः आसन्दे उपविष्टः नित्यं दृश्यते। स युष्मत्स्वामिनः बान्धवः वर्तते वा?' भृत्यस्तं वदति, 'भोः सज्जन, शृणोतु । एतं विशालं औषधालयं प्रत्यहं प्रायशः पञ्चसहस्रसङ्ख्यात्मकाः ग्राहकाः आगच्छन्ति। विविधानां चिकित्सकानाम् अक्षराणि को जानाति? स तु अत्रनियुक्तः अक्षरज्ञः।'**

अनुवाद – **अक्षरज्ञानी**

एकदा औषधे विकत घेणारा एक ग्राहक औषधालयात जाऊन तेथील नोकरास कुतूहलाने विचारतो. अहो मला ही माहिती हवी आहे की आपल्या दुकानात एक अतिवृद्ध खुर्चीत बसलेला नेहमी दिसतो. तो तुमच्या मालकाचा नातेवाईक आहे का? नोकर त्यास म्हणतो, अहो सद्गृहस्थ, ऐका– या मोठ्या औषधांच्या दुकानात दररोज साधारणपणे पाच हजार गिऱ्हाईके येत असतात. निरनिराळ्या डॉक्टरांची अक्षरे कोण ओळखतो. तो तर येथे नेमणुकीस असलेला अक्षरतज्ञ आहे.

## ५८. मूषकव्यापारः

**अथैकदा पात्रं प्रक्षालयन्ती काचित् ललना स्वामिनीं ब्रवीति, 'भो स्वामिनि, भवत्या नवनिर्मितमिदं भवनम् उचितसाधनयुक्तमस्ति। तथापि पूर्वतनं सदनमेव मह्यमरोचत।' स्वामिनी वदति, 'अयि सेविके, त्वं कथमेतद् ब्रवीषि, आश्चर्यमिदं खलु ।' ललना ब्रवीति, 'भोः स्वामिनि, शृणोतु भवती। पूर्वतने सदने बहवः मूषकाः आसन् । तैः निशायां कृतेन व्यापारेण मम अर्धं कार्यं जातमासीत् ।'**

अनुवाद – **उंदरांचे उद्योग**

एकदा कोणी एक भांडी घासणारी बाई मालकिणीस म्हणते, 'अहो बाई आपण नवीनच बांधलेले हे घर सर्व जरुरत्या सुखसोयींनी युक्त असे आहे. मात्र मला आपले पूर्वी असलेले जुने घरच फार आवडत होते.' मालकीणबाई तिला म्हणते, 'अगं तू असे कसे म्हणतेस? हे तर मोठे आश्चर्यच आहे.' भांडीवाली म्हणते, 'बाईसाहेब, जरा ऐका. पूर्वीच्या घरात पुष्कळ उंदीर होते. रात्रभर त्यांनी केलेल्या उद्योगाने माझे अर्धे काम झालेले असावयाचे.'

## ५९. मातापित्रोः आशीः

**महामार्गेण धावत् किमपि चतुश्चक्रयानं शिलातैलं भर्तुं शिलातैलभरणकेन्द्रं प्रविष्टम् । 'मातापित्रोः आशीः' इति यानस्य पार्श्वे पृथुशब्दैः चित्रितं वाक्यं तत्रस्थः भृत्यः पठितवान् । इन्धनस्य शुल्कं प्रदाय यानस्य स्वामी प्रस्थानमारभते। अत्रान्तरे तत्रस्थः भृत्यः स्वामिनं ब्रवीति, 'भोः महोदय यानस्य पार्श्वे लिखितं मया पठितमस्ति । अहो, महद्भाग्यं भवतः। क्व वर्तेते भवतः मातापितरौ?' 'वृद्धाश्रमे' इति उक्त्वा स्वामी यानं सवेगं चालयति।**

अनुवाद – **आईवडिलांचा आशीर्वाद**

महामार्गाने चालणारे एक चारचाकी वाहन पेट्रोल भरणेसाठी पेट्रोलपंपाचे ठिकाणी आले. ''आईवडिलांचा आशीर्वाद'' हे गाडीचे मागील बाजूस ठळक अक्षरातील रंगविलेले वाक्य तेथील नोकराने वाचले. गाडीत भरलेल्या इंधनाचे पैसे भरुन गाडीचा मालक गाडी घेऊन निघाला. इतक्यात तेथील नोकर गाडीच्या मालकास म्हणतो, साहेब, आपले मोठे भाग्य आहे. आपले आईवडील कोठे असतात? 'वृद्धाश्रमात' असे सांगून मालक जोरात गाडी चालवितो.

## ६०. स्थानमाहात्म्यम्

**कश्चित् रक्षापुरुषः कञ्चित् चौरं धृत्वा तस्य हस्तं शृङ्खलया बद्ध्वा**

**तथा अन्यद् हस्तं रज्ज्वा बद्ध्वा तं मुख्य रक्षानिरीक्षकस्य पुरतः स्थापितवान्। चौरं कांश्चित् प्रश्नान् पृष्ट्वा निरीक्षकः तं बन्दीगृहं स्थापयितुं रक्षापुरुषम् आदिष्टवान् ।**

**अत्रान्तरे आदेशमेतम् श्रुत्वा चौरः उच्चैः हसितुमारभत। निरीक्षकः तं पृच्छति, ' रे लुंठक न ते लज्जा वा? न ते भयं वा? किमर्थं त्वम् उच्चैः हससि?' चौरः मन्दं विहस्याब्रवीत् , 'भोः महोदय अहं तु दीनोऽस्मि निरक्षरोऽपि। नाहं कदापि भवत्स्थानम् उपवेष्टुं शक्नोमि। तथापि मत्स्थाने उपवेशनं भवतः शक्यं स्यादिति विचिन्त्य अहं हसामि ' इति।**

अनुवाद – **जागेचा महिमा**

एका पोलिसाने एका चोराच्या एका हातात बेडी घालून दुसऱ्या हातास दोर बांधून त्यास मुख्य पोलीस निरीक्षकासमोर उभे केले. निरीक्षकांनी चोरास काही प्रश्न विचारुन पोलिसास त्यास एका तुरुंगात ठेवण्याचा आदेश दिला.

हा आदेश ऐकून चोराने जोरात हसण्यास सुरुवात केली. निरीक्षक त्यास विचारतो, अरे चोरा, तुला काही लाज वाटते का? तुला कसली भीती वाटत नाही का? तू जोरजोरात कशास हसतोस? हसऱ्या चेहऱ्याने चोर म्हणतो, अहो साहेब मी गरीब माणूस आहे व निरक्षरपण आहे. मी आपले जागेवर कधीही बसू शकणार नाही. परंतु आपण मात्र माझे जागेवर बसू शकता या विचाराने मला हसू आले इतकेच.

## ६१. आधारः

**कस्मिंश्चित् ग्रामे प्राथमिकशालायाः भवनं पुरातनमभवत् । कक्षासु काष्ठस्तम्भानाम् आधारेण भित्तयः स्थिताः आसन् । इदं वृत्तं वृत्तपत्रेषु प्रकाशितम् जातम् । यथार्थतां प्रमाणीकुर्वाणानि छायाचित्राण्यपि मुद्रितानि । मुख्याध्यापकमहोदयः वृत्तपत्रं हस्ते गृहीत्वा पञ्चायतप्रमुखाय तद् अयच्छत्। ग्रामपञ्चायतप्रमुखः केचित् ग्रामस्थाः च पूर्वानुमतिं प्राप्य मण्डलपरिषदध्यक्षं अमिलन् ।**

**वृत्तपत्रं पठित्वा आगतानां सविस्तरं कथनं श्रुत्वा च अध्यक्षः तान् वदति, 'यूयं मयि विश्वसीत। पञ्चदशदिनावधैव नवीनाः भित्तिकाः यूयं द्रक्ष्यथ।' पश्चात् सर्वान् शीतपेयं पाययित्वा विनोदं जनयन् स ब्रवीति, 'भोः मान्यवराः प्राथमिकशालायाः भित्तिकाः आधारेण स्थिताः एतद् तु सत्यं, तथापि अस्माकं राज्यशासनोऽपि आधारेणैव जीवति ।'**

अनुवाद – **आधार**

एका खेडेगावातील प्राथमिक शाळेची इमारत जुनी झाली होती. वर्गातील भिंती लाकडी खांबांच्या आधारावर उभ्या होत्या. ही बातमी वर्तमानपत्रांत प्रकाशित झाली. वस्तुस्थिती दर्शविणारे फोटोही छापले. शाळेच्या मुख्याध्यापकांनी वृत्तपत्र सरपंचास दिले. सरपंचसाहेब व काही ग्रामस्थांनी पूर्वपरवानगी मिळवून जिल्हा परिषदेच्या अध्यक्षांची भेट घेतली.

वर्तमानपत्र वाचून तसेच आलेल्यांचे म्हणणे ऐकून अध्यक्ष त्यांना सांगतात तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवा, येत्या पंधरा दिवसातच तुम्ही नवीन भिंती पहाल. नंतर सर्वांना थंड पेय पाजून विनोदाने ते म्हणतात, सज्जनहो, प्राथमिक शाळेच्या भिंती आधारांवर उभ्या आहेत हे तर खरेच आहे. परंतु आपले राज्यशासन सुद्धा आधारावरच (पाठिंब्यावर) आहे.

## ६२. प्राणायामः

**कस्मिंश्चिद् सदने कोऽपि युवा प्रत्यहं नियतवेलायाम् एकचित्तं भूत्वा प्राणायामं करोति। अथैकदा तस्य प्रतिवेशिकस्य गृहं कश्चित् दूरादागतः अतिथिः आसीत् । प्राणायामं कुर्वाणमेतम् युवानं स पृच्छति, 'अहं तव प्राणायामक्रियां पश्यामि । युष्मादृशानां यूनां मम गर्वोऽस्ति । मम प्रभूतः सन्तोषः जातः । किन्तु कथय प्राणायामविधेः नित्यदिनचर्यायां कश्चित् लाभः भवति वा? '**

**कदाचित् युवा सादरं ब्रवीति, 'भोः महोदय, श्वासरोधकालः महान् वर्तते। पत्राणि, पुस्तकानि, वस्तूनि इत्यादीनि प्रापयन्  दूतोऽहं वृत्त्या (कुरिअर)।**

**सार्वलौकिकमूत्रस्थानं प्रविश्य तावत्कालावधौ पङ्क्तौ तिष्ठतः मम श्वासरोधः उपयुक्तः भवति।'**

अनुवाद – **प्राणायाम**

एका घरी एक तरुण दररोज ठराविक वेळेस एकचित्त होऊन प्राणायाम करतो. एकदा त्याचे शेजाऱ्याच्या घरी दूर राहणारा एक पाहुणा आला होता. प्राणायाम करणाऱ्या या तरुणास तो विचारतो, अरे मी आपली प्राणायामाची क्रिया पाहतो. तुमच्यासारख्या तरुणांचा मला अभिमान आहे. मला खूप समाधान झाले. परंतु हे सांगा की प्राणायामाचा आपल्या रोजच्या दिनचर्येत काही फायदा होतो कां?

तरुण आदरपूर्वक असे सांगतो की, महोदय श्वास रोखून धरण्याचा वेळ फार महत्वाचा असतो. पत्रे, पुस्तके, अनेक वस्तू वगैरे पोहोचविणारा मी एक कुरिअर आहे. सार्वजनिक मुताऱ्यांत शिरल्यानंतर रांगेत उभे राहताना तेथील वेळात श्वास रोखून धरणे फार उपयोगी असते.

## ६३. आश्चर्यम्

**एकपङ्क्तिमार्गविभागे धावन्ति मन्दगामीनि रेलयानानि सामान्यतः नित्यं विलम्बेन गच्छन्ति । एतादृशेन मन्दगामिना रेलयानेन व्यवसायार्थं प्रतिमासं त्रिचतुर्वारं किञ्चित् नगरं गच्छन् कोऽपि वस्त्रविपणिकः एकस्मिन् दिने रेलयानं नियतवेलायाम् आगतं दृष्ट्वा वातायनस्य सन्निधम् उपविष्टम् अन्यं सहयात्रिकं सकुतूहलं वदति, 'भोः महोदय अहमद्य महदाश्चर्यम् अनुभवामि । प्रत्यहं विलम्बेन धावत् रेलयानम् अद्यतनदिने नियतवेलायां कथं धावति? तद्वत् यानकोष्ठे बहूनि रिक्तस्थानान्यपि दृश्यन्ते।' सहयात्रिकः मन्दं विहस्य ब्रवीति, 'अहो एतद् यानं तु ह्यस्तनीयमस्ति।'**

अनुवाद – **आश्चर्य**

एकेरी मार्ग असलेल्या रेल्वे विभागातील पॅसेंजर गाड्या सामान्यपणे नेहमी उशीरा धावत असतात. अशा एका पॅसेंजर गाडीने धंद्याच्या निमित्ताने दर महिन्याला तीन चार वेळा एका शहरात जाणारा एक कापड व्यापारी एकदा गाडी वेळेवर आल्याचे

पाहून कुतूहलाने खिडकीशेजारी बसलेल्या एका सहप्रवाशास म्हणतो अहो महाशय, आज मला मोठे आश्चर्य वाटते. दररोज उशीराने धावणारी गाडी आज अगदी नियमित वेळेवर कशी काय धावत आहे? त्याचप्रमाणे रेल्वे डब्यात बरीच आसने रिकामी दिसत आहेत. सहप्रवासी किंचित हसून म्हणतो, अहो ही गाडीतर कालची आहे.

## ६४. शालानिरीक्षणम्

**कस्मिंश्चिद् ग्रामे प्राथमिकशालायां निरीक्षणार्थम् आगतः कश्चित् शिक्षानिरीक्षकः चतुर्थ्यां कक्षायां पठतः छात्रान् पृच्छति, 'भोः छात्राः कानि वस्तूनि स्फुटनीयानि वर्तन्ते? तेषां नामानि कथयत।' उत्सुकाः छात्राः उन्नीय हस्तान् प्रत्युत्तरार्थं सिद्धाः अभवन् ।**

**क्रमशः ते इत्थम् अवदन् -**

**प्रथमः - काचः, दर्पणः ।**

**द्वितीयः - कङ्कणम् ।**

**तृतीय : - त्रिचक्रयानस्य नेमिः**

**चतुर्थ : - परीक्षार्थं प्रेष्यमाणाः प्रश्नपत्रिकाः**

अनुवाद – **शाळा–तपासणी**

एका खेडेगावातील प्राथमिक शाळेत तपासणीसाठी आलेले एक शिक्षण तपासणी अधिकारी चौथीच्या वर्गात शिकत असलेल्या विद्यार्थ्यांना विचारतात, मुलांनो, फुटणाऱ्या वस्तू किती आहेत? त्यांची नावे सांगा. उत्तरे देण्यासाठी उत्सुक असलेले विद्याथी हात वर करुन उत्तरे देण्यासाठी तयारीत होते. क्रमाने त्यांनी अशी उत्तरे दिली.

पहिला : काच, आरसा

दुसरा : काचेची बांगडी

तिसरा : रिक्शाचा टायर

चौथा : परीक्षेसाठी पाठविण्यात येत असलेल्या प्रश्नपत्रिका.

# ६५. जनसेवा

**कस्मिंश्चिन्नगरे कश्चिद् ज्येष्ठनागरिकः दूरध्वनिद्वारा आरक्षीबलस्य मुख्याधीक्षकं पृच्छति, 'भोः महोदय अहमेकः ज्येष्ठनागरिकः ब्रवीमि । अहं प्रतिदिनं पश्यामि यद् नगरस्य क-विभागस्थिते पुलिस-जनता-साहाय्य केन्द्रे न कोऽपि रक्षापुरुषः अथवा प्रतिनिधिरपि दृश्यते।' अधीक्षकः तं वदति, 'भोः महोदय क्षम्यताम्, सम्प्रति अस्माकं कार्यालये वार्षिकनिरीक्षणं गतिशीलं विद्यते । न मे समयः, तथापि श्वः एतस्मिन्नेव समये तस्मिन् स्थाने वर्तमानानि फलकानि पठित्वा मां दूरध्वनिं करोतु ।'**

**अन्येद्युः सज्जनः दूरध्वनिं कृत्वा अधीक्षकं स्मारयति । अधीक्षकः तं पृच्छति, 'भवता फलकानि पठितानि वा? कथयतु तद्विषये।' सज्जनः ब्रवीति, 'फलके एकस्मिन् लिखितम् अस्ति, सत्यमेवजयते इति। अन्यस्मिन् पृथुशब्दैः लिखितम् अस्ति, चतुर्विंशतिघण्टां यावद् अनावृतं स्यात् इति ।' दूरध्वनिः खण्डितो भवति ।**

अनुवाद – **जनसेवा**

एका शहरात एक ज्येष्ठ नागरिक दूरध्वनीने पोलिसांच्या मुख्य अधीक्षकांना विचारतो, अहो साहेब मी एक ज्येष्ठ नागरिक बोलतो. आपले, येथील 'क' विभागातील पोलिस साहाय्य केंद्रात कोणीही पोलीस अथवा प्रतिनिधी नसतो हे मी रोज पाहतो. अधीक्षक त्यांना म्हणतात अहो महोदय आम्हास दया करा, हल्ली आमचे कार्यालयात वार्षिक तपासणी जोरात चालू आहे. मला वेळ नाही. तरीसुद्धा आपण उद्या याचवेळी तेथील फलकांवर काय लिहिले आहे ते वाचून मला फोन करा.

दुसरे दिवशी सज्जन ठरलेल्या वेळी फोन करुन अधीक्षकांना आठवण करुन देतो. अधीक्षक त्यांना विचारतात आपण तेथील फलक वाचलेत का? त्यासंबंधी बोला. सज्जन सांगतात 'सत्यमेव जयते' असा एक फलक आहे व दुसरा मोठ्या अक्षरात लिहिलेले आहे 'चोवीस तास उघडे राहील' फोन खंडित होतो.

# ६६. देवपूजा

**कस्मिंश्चिन्नगरे कोऽपि सज्जनः भाटकेन क्रीतां एकस्याम् सदनिकायां सकुटुम्बं निवसति। एकस्मिन् दूरस्थे ग्रामे - कोकणप्रदेशे तस्य श्वशुरगृहमासीत्। तस्य भार्या विविधानि व्रतानि कुर्वाणा सुसंस्कारिता आसीत्। दीर्घरोगग्रस्तायाः तस्याः मातुः शुश्रूषार्थं मासपूर्वं सा मातृगृहं गता आसीत्। एकस्मिन् दिने सज्जनस्य सदने पात्रप्रक्षालनादि कार्यं कुर्वन्ती नारी सज्जनं सकुतूहलं पृच्छति, 'भोः स्वामिन् अद्य वा श्वः वा स्वामिनी महोदया ग्रामादागच्छति वा?'**

**सज्जनः प्रत्युत्तरति, 'आम् अद्य सायङ्काले सा राज्यपरिवहनयानेन आगमिष्यति तां यानात् अवतारयितुं तथा तस्याः वस्तूनि आनेतुं यानविरामबिन्दुम् अहं गमिष्यामि, किन्तु कथय त्वं कथमेतद् मां पृच्छसि यतः न मया त्वां तस्याः आगमनविषये किमपि कथितम्।' नारी मन्दं विहस्याब्रवीत् , 'मासावधौ अहम् अद्यैव भवन्तं देवपूजां कुर्वाणं दृष्टवती।**

अनुवाद – **देवपूजा**

एका शहरात एक सज्जन भाड्याने घेतलेल्या सदनिकेत सहकुटुंब रहात होता. एका दूरच्या गावात कोकणात त्याची सासुरवाडी होती. त्याची पत्नी निरनिराळी व्रते करणारी, चांगले संस्कार झालेली होती. दीर्घरोगाने ग्रस्त असलेल्या तिच्या आईची सुश्रुषा करण्यासाठी ती आपल्या आईच्या घरी (माहेरी) एक महिन्यापूर्वी गेली होती. एके दिवशी सद्गृहस्थाचे घरी भांडी घासणे, इत्यादी काम करणारी बाई सद्गृहस्थास कुतूहलाने विचारते, अहो मालक, आज उद्या, मालकीणबाई गावाकडून यणार आहेत कां ?

सद्गृहस्थ म्हणतात, होय आज संध्याकाळी ती एस.टी.ने येणार आहे. तिला एस.टी.तून उतरवून घेण्यासाठी व तिचे सामान आणण्यासाठी स्टँडवर मी जाणार आहे. परंतु मला हे सांग की, तू हे कसे विचारतेस ? कारण मी तुला तिच्या येण्याविषयी काहीच बोललो नाही. बाई किंचित हसून म्हणते, अहो महिनाभरात मी आजच तुम्हाला देवपूजा करताना पाहिले.

# ६७. शुद्धीकरणम्

**अथैकदा कस्यचित् सज्जनस्य मित्रं दूरध्वनीद्वारा तस्य हार्दमभिनन्दनं करोति। सज्जनः तं पृच्छति, 'रे वयस्य किमर्थं त्वं प्रत्यूषे मामभिनन्दसि। स ब्रवीति अहो अहं त्वां मधुरां वार्तां श्रावयामि शृणु, गतसप्ताहे भूतायाः स्पर्धापरीक्षायाः मराठी-विषयस्य प्रश्नपत्रिकायां भवल्लिखितस्य पुस्तकस्य परिच्छेदांशः समाविष्टः अस्ति।' सज्जनः तं प्रत्युत्तरति, 'अहं सम्प्रति काश्मीरदेशेषु पर्यटने निमग्नोऽस्मि। विंशति दिनानन्तरं तत्रागत्य द्रक्ष्यामि।'**

**तस्यागमनवार्तां श्रुत्वा तस्य मित्रं सज्जनं प्रश्नपत्रिकां दर्शयति। सज्जनस्य लेखः प्रश्नपत्रिकायां समाविष्टः आसीत्। तेन प्रमुदितः सः पाकगृहे गत्वा वायुचुल्लिकायां ओदनं पचन्त्यै स्वभार्यायै तं परिच्छेदं दर्शयति। सा अपि मुदिता भवति। किन्तु प्रश्नपत्रिकायां मुद्रितस्य लेखस्योपरि लिखितमासीत्। — अधोलिखितं लेखं शुद्धीकुरुत।**

अनुवाद – **शुद्धीकरण**

एकदा एक सज्जन त्याचे मित्राचे अभिनंदन करतो. सज्जन विचारतो, अरे मित्रा तू इतक्या सकाळीच माझे कशासाठी अभिनंदन करतोस ? तो म्हणतो, मी तुम्हाला गोड बातमी ऐकवणार आहे. ऐका. गेल्या आठवड्यात झालेल्या स्पर्धा परीक्षेच्या मराठी विषयाच्या प्रश्नपत्रिकेमध्ये आपण लिहिलेल्या पुस्तकातील एका परिच्छेदाच्या काही भाग समाविष्ट झाला आहे. सज्जन त्यास म्हणतो मी आता काश्मीरमध्ये फिरत आहे. वीस दिवसानंतर तेथे आल्यावर पाहीन.

तो परत आल्याची बातमी ऐकून मित्र सज्जनास प्रश्नपत्रिका दाखवतो. सज्जनाचे लिखाणाचा प्रश्नपत्रिकेत समावेश होता. आनंदित होऊन तो स्वयंपाकघरात जातो व गॅस शेगडीवर भात शिजवीत असलेल्या पत्नीस तो परिच्छेद दाखवितो. तिला सुद्धा आनंद होतो. मात्र प्रश्नपत्रिकेतील छापलेल्या लेखावर लिहिले होते, 'खालील उतारा / लेख शुद्ध करुन लिहा.'

# ६८. चतुरः पुरोहितः

**कोऽपि सदनिकास्वामी पूजाविधेः पौरोहित्याय आमन्त्रितं कञ्चित् पुरोहितं सकुतूहलं पृच्छति, 'भोः गुरुवर कार्यालयेभ्यः अस्माकं पादत्राणान् कुशलाः चौराः चोरयन्ति। भवान् तु प्रायशः प्रत्यहं कार्यालयान् गच्छति। एतस्मिन् विषये भवान् किं करोति? कस्तेऽनुभवः?'**

**पुरोहितः उच्चैः हसन् ब्रवीति, 'भवान् उचितं पृच्छति, अहो पुरोहितानां एषः प्रश्नः गभीरः। नाहं जाने अन्ये पुरोहिताः किं कुर्वन्ति तथापि किमहं करोमि तत् शृणोतु। विवाहकार्यालयेषु वधूवरपक्षाभ्याम् स्वतन्त्रौ कक्षौ स्तः। अहं प्रत्येके कक्षे पृथक् पृथक् पादत्राणं स्थापयामि।'**

अनुवाद – **चतुर पुरोहित**

एका सदनिकेचा मालक पूजेसाठी आमंत्रित केलेल्या पुरोहितास कुतूहलाने विचारतो, अहो गुरुजी कार्यालयातून सराईत चोर आमच्या चपला नेहमी चोरतात. आपण तर बहुधा दररोज कार्यालयात जाता. या बाबतीत आपण काय करता ? आपला काय अनुभव आहे ?

पुरोहित जोरात हसत म्हणतात, आपण योग्य विचारत आहात. अहो पुरोहितांचा हा गंभीर प्रश्न आहे. इतर पुरोहित काय करतात हे मला माहित नाही. परंतु मी काय करतो ते ऐका. कार्यालयांमध्ये वधू व वर या दोन्ही पक्षांसाठी स्वतंत्र खोल्या असतात. मी प्रत्येक खोलीत एक एक चप्पल ठेवतो.

# ६९. लग्नपत्रिका

**दूरगामिन्याः लोहपथगामिन्याः सामान्यवाहने सकुटुम्बं यात्रां कुर्वाणः कोऽपि सज्जनः अन्यं सहयात्रिकं सविनयं पृच्छति, 'भोः महोदय उपरि स्थापितं तव गुण्ठितं शय्योपकरणं रेलयानस्य सवेगं धावनेन तीव्रं कम्पते तद् ऊर्ध्वात् अधः आनयतु अन्यथा अस्माकं शिरसि तद् अवपतिष्यति। मया सह मम शिशुः अपि अस्ति।' सज्जनः तं वदति, 'महोदय, न तद्**

**शय्योपकरणं तद् तु विवाह निमन्त्रणपत्रिकाणां गुण्ठनम् । अहं पत्रिकाः वितरणार्थं नयामि।'**

अनुवाद – **लग्नपत्रिका**

लांब पल्ल्याच्या रेल्वे गाडीच्या जनरल डब्याने प्रवास करणारा एक सद्गुहस्थ दुसऱ्या सहप्रवाशास विचारतो की महोदय, वर ठेवलेले बेडिंग/वळकटी रेल्वेच्या वेगाने जोरात हलत आहे. ते वरुन खाली आणा नाहीतर ते आमच्या डोक्यावर पडेल. माझ्या बरोबर लहान मूल सुद्धा आहे. सद्गृहस्थ म्हणतात, महाशय ते बेडिंग नसून तो लग्नपत्रिकांचा गठ्ठा आहे. मी पत्रिकांचे वाटप करण्यासाठी त्या नेत आहे.

## ७०. जल्पनम्

**अथैकदा एकस्मिन् दिने सप्ताष्टवर्षवयस्कौ द्वौ सखायौ नगरपालिकायाः उद्याने उपविश्य जल्पनं कुरुतः स्म। एकं मित्रं द्वितीयं वदति, 'रे मित्र ह्यस्तनायां तम्यां निशायाम् अस्माकं गृहे विनोदशीला घटना अभूत्। कश्चिच्चौरः वातायनस्य लोहदण्डानवनमय्य स्नानगृहं प्राविशत्। तत्समये एव मम वृद्धपितामहः निद्रायां जल्पनम् आरभत। स निवृत्तः प्राध्यापकः तथा प्रख्यातः वक्तापि। तस्य भाषणं श्रुत्वा चौरः पलायितः।'**

**द्वितीयं मित्रं ब्रवीति, 'रे मित्र शृणु, मम पितामहस्य कर्णौ महान्तौ कठिनौ वर्तेते। तस्य समीपं गत्वा घण्टानादं यदि कुर्यात् तर्हि तस्य लेशोऽपि निद्राभङ्गो न भवति।' (स द्वाभ्यामपि कर्णाभ्यां सर्वथा बधिरः अस्ति।)**

अनुवाद – **गप्पा**

एके दिवशी सातआठ वर्षे वयाचे दोन मित्र नगरपालिकेच्या उद्यानात बसून गप्पा मारीत होते. एक मित्र दुसऱ्यास म्हणतो अरे मित्रा कालच्या काळोख्या रात्री आमच्या घरी एक विनोदी घटना घडली. एक चोर आमच्या बाथरुमच्या खिडकीचे लोखंडी गज वाकवून आत शिरला. त्याचवेळी माझ्या म्हाताऱ्या आजोबांनी झोपेत बडबड सुरु केली. ते निवृत्त प्राध्यापक असून प्रख्यात वक्तेही बाहेत. त्यांचे भाषण ऐकून चोर पळाला.

दुसरा मित्र म्हणतो, अरे मित्रा ऐक. माझ्या आजोबांचे कान खूप कठीण आहेत.

त्यांच्याजवळ जाऊन घंटा वाजवली तरी त्यांची थोडीसुद्धा झोपमोड होत नाही. (ते दोन्ही कानांनी पूर्णतः बहिरे होते.)

## ७१) प्रचारः

**कश्चित् युवा बहिरटति। तं दृष्ट्वा वृत्त्या वणिजः सन् तस्य पूर्वशालामित्रम् तं विपण्याम् आहूय पृच्छति, 'रे मित्र, इयति चण्डातपे किमर्थं भ्रमसि?' युवा वदति, ' प्रचारार्थम्।' मित्रं पृच्छति, 'कस्य प्रचारः?' युवा वदति, 'चण्डातपे गृहात् बर्हिगमनं न कुर्यात्।'**

अनुवाद – **प्रचार**

एक तरुण बाहेर भटकत होता. त्याला पाहून व्यापारी असलेला त्याचा जुना शाळा दोस्त त्याला दुकानात बोलावून त्याला विचारतो. अरे दोस्ता इतक्या कडाक्याच्या उन्हात का भटकतोस? तो तरुण असे म्हणतो, प्रचारासाठी. मित्र विचारतो, कशाचा प्रचार ? तरुण असे म्हणतो, कडाक्याच्या उन्हात घराच्या बाहेर पडू नका.

## ७२) परिहासः

**अथैकदा कस्मिंश्चित् ग्रामे धूलिवन्दनस्य दिने केचित् परिहासशीलाः युवानः कस्मादपि स्थानात् काष्ठफलकं उद्धृत्य तद् ग्रामस्य मध्यभागस्थिते चतुष्पदे रथ्यातटे स्थापितवन्तः। मार्गेण गच्छन्तः फलकं पठित्वा अहसन् लेखकं प्राशंसयन् च। फलके शुक्लशिलया पृथुशब्दैर्लिखितमासीत्। —एतस्मिन् फलके कोऽपि, किमपि न लिखेत्।**

अनुवाद – **थट्टा**

एकदा एका खेड्यात धुळवडीच्या दिवशी काही खोडसाळ तरुणांनी कोठून तरी लाकडी फळा उचलून आणून तो एका चौकातील रस्त्याला कडेला ठेवला. रस्त्याने जाणारे फलक वाचून हसत व लिहिणाऱ्यांची स्तुतीही करीत होते. फळ्यावर ठळक अक्षरात लिहीले होते -

या फळ्यावर कोणीही काहीही लिहू नये.

## ७३. फलविक्रेता

**कस्मिंश्चिन्नगरे कश्चित् फलविक्रेता आसीत्। तस्य पञ्चषड्विपणयः आसन्। नवीनानां तथा मधुराणां फलानां विक्रेता इति तस्य सर्वत्र ख्यातिरासीत्। शय्यागतरुणानां कृते विपुलमात्रेण प्रत्यहं फलानि गृण्हन्तः विविधाः चिकित्सालयाः तस्य नित्यग्राहकाः आसन्। प्रार्थनमनुसारेणापि फलानि पूरयितुं स सर्वदा समर्थः आसीत्। विक्रेतृसङ्घस्य नेताऽयम् अंशकालिकः अध्यक्षोऽपि आसीत्।**

**अथैकदा ज्येष्ठनागरिकसङ्घस्य त्रिचतुर्कार्यकर्तारः पूर्वानुमतिं प्राप्य तस्य जन्मवर्धापनदिने तस्मै शुभकामनाः अर्पयितुं तस्य गृहं सम्प्राप्ताः। पुष्पगुच्छादि प्रदाय तस्य व्यवसायविषयकं तं कथयितुं प्रार्थितवन्तः। तेषु एकः तं पृच्छति, 'महोदय कस्य प्रेरणया भवान् फलविक्रेता अभवत् ?'**

**स प्रत्युत्तरति, 'पितामहः मम प्रेरणास्थानम् । तेन त्रिवारं मन्त्रित्वं भूषितमासीत् । तस्य अस्वास्थ्यकाले तं मिलितुमागताः सर्वे पुष्कलमात्रेण विविधानि फलानि तस्मै अर्पयन्ति स्म। इयतां फलानां किं कुर्याम् इति विचार्य अहं शालायाः समीपं शनैः शनैः फलानां विक्रयम् आरभे। अभ्यासे मम रुचिर्नासीत्।'**

अनुवाद – **फळव्यापारी**

एका शहरात एक फळव्यापारी होता. त्याची पाचसहा दुकाने होती. ताजी व गोड फळे विकणारा अशी त्यची सर्वत्र ख्याती होती. अंथरणावर पडून असलेल्या रोग्यांसाठी दररोज भरपूर फळे घेणारी अनेक हॉस्पिटले त्याची रोजची गिऱ्हाईके असत. मागणीप्रमाणे फळांचा पुरवठा करण्यासाठी तो नेहमीच तत्पर असे. फळविक्रेता संघाचा नेता असलेला तो काही काळ अध्यक्षही होता.

एकदा ज्येष्ठ नागरिक संघाचे तीन-चार कार्यकर्ते पूर्वसंमती घेऊन त्याच्या वाढदिवसाचे दिवशी शुभकामना देण्यासाठी त्याचे घरी गेले. पुष्पगुच्छ वगैरे देऊन त्याला त्याच्या व्यवसायासंबंधी माहिती सांगण्यास विनंती केली. त्यांचेपैकी एकजण विचारतो, महोदय

कोणाच्या प्रेरणेने तुम्ही फळव्यापारी झालात ?

तो उत्तर देतो, माझे आजोबा माझे प्रेरणास्थान आहे. त्यांनी तीन वेळा मंत्रीपद भूषविले होते. त्यांच्या आजारपणात त्यांना भेटावयास येणारे निरनिराळी फळे त्यांना देत असत. इतक्या फळांचे काय करावे असा विचार करुन मी शाळेजवळ हळूहळू फळांची विक्री चालू केली. अभ्यासाची मला आवड नव्हती.

## ७४. कथय कोऽहम् कथय कोऽहम्

**धावामि धरणीं चरणं विनाऽहम् । गच्छामि गगनं विना विमानम् ।**
**पश्यामि लोकान् विना लोचनम् । शृणोमि भाष्यं कर्णं विनाहम् ।।१।।**

**अहं न याचे वस्त्रं कदापि । अहं न याचे खाद्यं कदापि ।**
**अहं न याचे जलं कदापि । अहं न याचे धनं कदापि ।।२।।**

**पतामि हस्ते क्वचित् प्रसङ्गे । पतामि हस्तात् क्वचित् प्रसङ्गे ।**
**करोमि पारं सीमारेखाम् । न रोधयति चेत् रेखापूर्वम् ।।३।।**

**क्षिपन्ति यष्ट्यां दूरादहो माम् । प्राप्नोमि पृष्ठे पट्टप्रहारम् ।**
**निपत्य यष्टिं प्रहिणोमि शीघ्रम् । पट्टाधारकं पटमण्डपेऽहम् ।।४।।**

**विमुच्य हस्तात् पुनरुत्पतामि । गत्वा सुदूरं स्थित्वा हसामि ।**
**धर्तुं यतन्ते वितथं परं मां । उद्धृत्य मां ते प्रतिक्षिपन्ति ।।५।।**

**न रोधयति मां जातीयवादः । चण्डातपो वा वर्षा तथा वा**
**विश्वमेलनं विश्व-एकताम् । कार्यं मे सततं, कार्यं से सततम् ।।६।।**

**कथय कोऽहं कथय कोऽहम् ।।**

अनुवाद – **<u>ओळखा मी कोण? ओळखा मी कोण?</u>**

पाय नसून मी जमिनीवर पळतो, विमान नसूनही मी आकाशात जातो
डोळे नसूनही मी लोकांना पाहतो, कान नसूनही मी बोलणे ऐकतो ।।१।।

मी कधीही नेसण्यासाठी कपडे मागत नाही, मी कधीही खाण्यासाठी मागत नाही
मी कधीही पाणी मागत नाही, मी कधीही पैशाची मागणी करीत नाही ।।२।।

केव्हा केव्हा मी हातात पडतो, कधी कधी मी हातातून निसटून पडतो
मला कोणीही अडविले नाही, तर मी सीमारेषा पार करतो ।।३।।

अहो मला फार लांबूनच यष्टीवर फेकतात, व माझ्या पाठीवर बॅटचा प्रहार करतात. यष्टीवर आदळून मी ताबडतोब, फळी(बॅट)धारकाला तंबूत पाठवितो ।।४।।

हातातून निसटून मी पुन्हा वर उडतो, व दूर उभा राहून हसतो
मला पकडण्याचा व्यर्थ प्रयत्न करतात, व पुन्हा उचलून उलट फेकतात ।।५।।

मला जातपात अडवत नाही, कडक उन्हाळा किंवा पाऊसही (अडवत नाही)
जगाचे संघटन व एकता करणे, हेच माझे आहे नेहमीचे काम नेहमीचे काम ।।६।।

## ७५. कथय कोऽयम् -

(उपजातिवृत्तम्)

**अयं न भक्तो न च पूजको वा । घण्टां स्वयं नादयते तथापि ।।**
**धनं जनेभ्यः किल याचतेऽयम् । न याचको वा न च निर्धनो वा ।।१।।**

**धनं प्रभूतं स चिनोति नित्यम् । स्वामी परं नास्ति धनस्य नूनम् ।।**
**स्वयं न वैद्योऽपि विपत्तिकाले । करोति शीघ्रं प्रथमोपचारान् ।।२।।**

**जानाति को वा बुधवाचकेषु । महोदयः स्यात् बसवाहको वा ।।**

अनुवाद – **सांगा हा कोण?**

हा भक्त नाही तसेच पुजारीही नाही. परंतु हा घंटा मात्र वाजवतो. हा लोकांकडे पैशाची मागणी करतो. परंतु तो भिकारी अथवा निर्धनही नाही.

तो भरपूर रक्कम गोळा करतो, परंतु पैशांचा मालक नाही, स्वतः डॉक्टर नसून तो संकटकाळी मात्र लोकांवर लगेच प्रथमोपचार करतो.

सूज्ञ वाचकांमध्ये हा कोण आहे ते कोणी ओळखतो का ते बघा. हा महाभाग बसचा कंडक्टर (वाहक) असेल का हो?

# ७६. जानाति को वा मम नामधेयम् (१)

(उपजातिवृत्तम् )

**तृष्णा न मे वा न तथा क्षुधा वा । पादौ न मे वा नयने न मे वा ।**
**शिरो न मे वा वदनं न मे वा तथापि लोकेषु चरामि नित्यम् ।।१।।**
**ज्ञानं भविष्यं कथये जनेभ्यः । सुशब्दकूटैः रमयामि कांश्चित् ।**
**जानाति को वा मम नामधेयम्? तदस्ति किं वा दिनवृत्तपत्रम् ।।२।।**
**भ्रमामि पद्भ्यां जनतासु नित्यम् । यानं मदर्थं हि निरर्थकं स्यात् ।**
**करे समूहो धृतकर्गजानाम् । स्कन्धेऽस्ति कोषो निहितस्तथैव ।।३।।**
**सोपानमार्गाः यदि मां त्रसन्ति । तथापि तुष्टोऽस्मि सदा प्रसन्नः ।**
**लोकप्रियोऽहं गणवेशधारी । जानाति को वा मम नामधेयम् ।।४।।**
**न मे निवृत्तिर्न च मेऽवकाशः। न मे विरामो न च रञ्जनं मे ।**
**कार्यं महन्मेऽस्ति गृहे गृहेऽपि । जानाति को वा मम नामधेयम् ।।५।।**
**कुटुम्बिनीनां विपदो भवन्ति न स्यामहं कार्यरता कदापि ।**
**विश्वासनीयास्मि सदा प्रसन्ना । जानाति को वा मम नामधेयम् ।।६।।**

(उत्तराणि १.२. वृत्तपत्रम्, ३.४ पत्रवितारक: ५.६ पात्रप्रक्षालिका नारी च)

अनुवाद – **कोण जाणतो माझे नाव? (१)**

मला तहान नाही तसेच भूकही नाही. मला पाय नाहीत तसेच डोळेही नाहीत. मला डोके नाही व तोंडही नाही. परंतु मी लोकांमध्ये हिंडतो, लोकांना मी माहिती देतो. त्यांचे भविष्यही सांगतो. काहींचे मी शब्दकोड्यांनी मनोरंजनही करतो. माझे नाव कोणास माहिती आहे का? अहो ते रोजचे वर्तमानपत्र आहे का हो?

मी लोकांमध्ये नेहमी पायी हिंडतो कारण कोणतेही वाहन, माझेसाठी निरर्थक ठरेल. मी हातामध्ये कागदांचा गठ्ठा धारण करणारा आहे. माझ्या खांद्यावर तशीच पिशवीही असते. इमारतीचे जिने जरा मला त्रासदायक असतात. तरीसुद्धा मी नेहमी प्रसन्न व संतुष्ट असतो. मी गणवेश धारण करणारा सर्वांना प्रिय असणारा आहे. माझे

नाव कोणास माहिती आहे का हो?

मला निवृत्ती नाही व सुट्टीही नाही. मला विश्रांती नाही व मोकळीकही नाही व मनोरंजनही नाही. घराघरातून माझे महत्वाचे काम असते. माझे नाव कोणास माहिती आहे का? मी कधी कामावर नसेन तर कुटुंबातील स्त्रियांवर संकट ओढवते. मी विश्वासू आहे व नेहमी प्रसन्न असते. माझे नाव कोणास माहिती आहे का हो?

(उत्तरे – १.२ वर्तमानपत्र ३.४ – पोस्टमन ५.६ –भांडी घासणारी बाई.)

## ७७. जानाति को वा मम नामधेयम् (२)

(उपजातिवृत्तम्)

**ऊर्ध्वादधस्तं भुवि मे प्रवासः । तथाप्यधस्तान्न कदापि चोर्ध्वम् ।।**
**चलामि धावामि विना विरामम् । न मूलभूमिं पुनरेमि नूनम् ।।१।।**

**भिन्नप्रदेशेषु तथा वनेषु । सेतोरधस्तादपि मे प्रवासः ।।**
**कदापि कस्मादपि मे न भीतिः । चण्डातपे वा शिशिरे ऋतौ वा ।।२।।**

**ऋतौ निरभ्रे ततचन्द्रिकायाम् । चन्द्रस्य बिंबं मयि कौमुदीं च ।।**
**विलोकयन्तः रतपर्यटन्तः । नृत्यन्ति गायन्ति विनोदयन्ति ।।३।।**

**न मेऽस्ति बन्धुर्न च बान्धवा मे । न मे सखायो न च शत्रवोऽपि ।।**
**तथापि सख्यो विपुला मदीयाः । देशे विदेशे प्रसृताः भवन्ति ।।४।।**

**माता मदीया पृथिवी पवित्रा । पृष्ठे धरन्ती सततं प्रवासे ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तदस्ति किं वा तटिनी नदी वा ।।५।।**

अनुवाद – **कोण जाणतो माझे नाव? (२)**

वरुन खाली जमिनीवरुन माझा प्रवास असतो. परंतु खालून वर कधीही नसतो. मी चालते, धावते मला विश्रांती नसते मी मूळ जागेकडे पुन्हा जात नसते ।।१।।

निरनिराळ्या प्रदेशांतून, जंगलातून तसेच पुलाखालून सुद्धा माझा प्रवास असतो. मला कधीही कोणाकडूनही भीती नसते. कडक उन्हाळा असो वा थंडी.।।२।।

निरभ्र आकाशातील पसरलेल्या चांदण्यात माझ्यातील पडलेले चंद्राचे प्रतिबिंब तसेच चांदणेही पाहताना रममाण झालेले पर्यटक आनंदून नाचतात, गातात व मनोरंजन करतात. ।।३।।

मला भाऊ नाही व नातेवाईकही नाहीत. मला मित्र नाहीत तसेच शत्रूही नाहीत. परंतु देशात व परदेशात पसरलेल्या मैत्रिणी मात्र भरपूर आहेत. ।।४।।

सततच्या प्रवासात पाठीवर धरणारी माझी आई पवित्र अशी पृथ्वी आहे माझे नाव कोणास माहीत आहे का? अहो ते तटिनी (नदी) आहे का? ।।५।।

## ७८. जानाति को वा मम नामधेयम् (३)

(उपजातिवृत्तम्)

**हस्तेन धृत्वा नयते बहिर्माम् । आनीयते मां सदनं तथैव ।।**
**मां पाति नित्यं स्वशिशोः समानम् । न बालकोऽहं न शिशुस्तथैव ।।१।।**
**स्वामी न मां स्नाति कदापि नूनम् । देवो हि मां सिञ्चति वृष्टिकाले ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तदस्ति वर्षासमयस्य छत्रम् ।।२।।**

अनुवाद – **कोण जाणतो माझे नाव? (३)**

हाताने धरुन मला बाहेर नेतात. त्याचप्रमाणे घरी आणतात. मला स्वतःच्या मुलाप्रमाणे सांभाळतात. परंतु मी मूल किंवा लहान बाळ नाही

माझा मालक मला कधीही आंघोळ घालत नाही, देवच मला पावसाळ्यात आंघोळ घालतो. माझे नाव कोणास माहीत आहे का? ते तर पावसाळ्यातील छत्री आहे का?

## ७९. जानाति को वा मम नामधेयम् (४)

(उपजातिवृत्तम् )

**नरस्य वेषस्य भवामि भागः । न सूचकः सीव्यति भागमेतम् ।।**
**शुभेषु कार्येषु विराजमानः । श्रेष्ठोऽस्मि वेशेषु ममोर्ध्ववासात् ।।१।।**
**श्यामोऽस्ति वर्णो धवलस्तथा मे । प्रक्षालनं मे क्रियते न नित्यम् ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तद्वर्तते वा प्रथितं शिरस्त्रं ।।२।।**

अनुवाद – **कोण जाणतो माझे नाव? (४)**

मी पुरुष–वेशाचा एक भाग आहे. कोणीही शिंपी माझी शिलाई करुन देत नाहीत. मी शुभकार्यांमध्ये शोभून दिसणारा असून माझे वेषांमधील सर्वात वरचे स्थान असलेमुळे मी सर्व वेषांमध्ये श्रेष्ठ आहे. माझा काळा व पांढरा रंग असतो. मला नेहमी धुतले जात नाही. माझे नाव कोणास माहीत आहे का? ते डोक्यावरील टोपीचे आहे का?

## ८०. जानाति को वा मम नामधेयम् (५)

(उपजातिवृत्तम्)

**पद्भ्यां नयन्ते सततं बहिर्माम् । तथा गृहं मां पुनरानयन्ति ।।**
**कुटुंबिकानां घटकोऽस्मि नूनम् । जानाति को वा मम नामधेयम् ।।१।।**

**कुटुंबिकानां घटकोऽपि भूत्वा । स्थानं मदीयं सदनस्य कोणे ।।**
**मार्गस्थगर्ताः बहु मां त्रसन्ति । परं तदर्थं न च कोऽप्युपायः ।।२।।**

**चण्डातपः पीडयते ममाङ्गम् । शीतं तथा कम्पयते शरीरम् ।।**
**नृणां तनूनां निजरक्षकोऽस्मि । तथापि ते मामवमानयन्ति ।।३।।**

**क्षिपन्ति मञ्चं प्रति मां सभासु । श्रुत्वाऽप्रियां वाचमतिप्रकोपात् ।।**
**चित्वा न मां तेऽपि चिरं त्यजन्ति । क्रुद्धाः जनाः सन्ति विवेकहीनाः।।४।।**

**भूत्वा विदीर्णां सुतनूं मदीयाम् । क्षिपन्ति दूरं च विना विलम्बम् ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तद् वर्तते वा प्रथितं पदत्रम्? ।।५।।**

अनुवाद – **कोण जाणतो माझे नाव? (५)**

नेहमी मला पायांनी बाहेर नेतात व त्याचप्रमाणे मला पुन्हा घरी आणतात. मी कुटुंबाचा घटक आहे. माझे नाव कोणी ओळखतो का? ।।१।।

मी कुटुंबाचा घटक असून सुद्धा घरातील कोपरा ही माझ्यासाठी जागा आहे. रस्त्यातील खड्डे मला खूप त्रास देतात. परंतु त्यासाठी काहीच उपाय नाही. ।।२।।

कडक उन्हाळा माझ्या शरीरास वेदना देतो. तसेच गारठ्याने माझे अंग कापते. माणसाच्या शरीराचा मी त्याचा स्वत:चा अंगरक्षक आहे. परंतु तरीही ते माझा अवमान

करतात. ।।३।।

सभांमधील अप्रिय भाषण ऐकून खूप राग आल्याने मला वक्त्यांकडे फेकतात. मला गोळा न करता ते माझा कायमचा त्याग करतात. (अहो) रागीट लोक विचारशून्य असतात. ।।४।।

माझे सुंदर शरीर जीर्ण झाल्यावर ताबडतोब मला दूर फेकून देतात. माझे नाव कोणास माहीत आहे का?(अहो) ते तर पादत्राण/पायतण असेल का? ।।५।।

## ८१. विश्वदूतौ

**यमः स्याद्वा भटः स्याद्वा दूतौ स्तो भुवने खलु ।**
**देवदूतो यमः स्वर्गे राजदूतो भटो भुवि ।।१।।**

**द्वारे वरं चागमनं यमस्य । परं वरं नास्ति भटस्य नूनम् ।।**
**द्वारे यमस्तिष्ठति चैकवारम् । भटः परं तिष्ठति नैकवारम् ।।२।।**

**यमोऽस्ति ते नाम, न तद् यथार्थम् । यतो न लोके नियमस्त्वदर्थम् ।।**
**प्रणाननेकान् हरतः सदा ते । कुतो विरामोऽपि कुतो निवृत्तिः ।।३।।**

**कार्यं महत्ते किल राजदूत । व्याख्या परं का जनरक्षकस्य ।।**
**करोषि रक्षामिति रक्षकोऽसि । करोषि रक्षामिति नाशको वा ।।४।।**

अनुवाद –

**विश्वदूत**

यम असो की, पोलीस असो, दोघेही विश्वातील दूतच होत. यम हा स्वर्गातील देवदूत आहे तर पोलीस हा पृथ्वीवरील राजदूत आहे.

आपल्या दारात यम आलेला बरा. परंतु पोलिसांचे येणे काही चांगले नाही. यम दारात एकदाच येतो. परंतु पोलीस मात्र दारात अनेकवार येतो.

अरे यमा तुझे नाव काही योग्य नाही रे. कारण या जगात तुला काही नियमच नाही. अनेकांचे प्राण सतत हरण करणाऱ्या तुला सुट्टी किंवा निवृत्ती आहेच कोठे?

अरे राजदूता – पोलिसदादा, तुझे काम फार मोठे आहे रे. परंतु जनरक्षक असलेल्या तुझी व्याख्या तरी काय आहे? राखण करतोस म्हणून तुला रक्षक समजायचे की रक्षा म्हणजे राख करणारा म्हणून तुला नाश करणारा समजावयाचे?

# ८२. सुखी मनुष्यः

(उपजातिवृत्तम्)

**को वर्ततेऽस्मिन् भुवने सुखी सन् । विद्वद्वरा वा धनिकास्तथा वा ।।**
**दीनाः सशक्ता अतिशिक्षिता वा । बाला युवानः कविलेखका वा ।।**

**तस्योत्तरं स्यादिदमेव मन्ये । कृतापराधात् धृतपापकर्मा ।।**
**कारागृहे यो लभते सुनिद्राम् । गाढां सुशान्तां सकलक्षपायाम् ।।**

अनुवाद – **सुखी मनुष्यः**

या जगात कोण सुखी असणारा आहे? विद्वान लोक, धनवन्त असतील का? गरीब सशक्त, अतिशिकलेले किंवा बालके, तरुणलोक कवी–लेखक असतील कां?

मला वाटते त्याचे हे उत्तर असेल की, अपराध केल्यामुळे पकडला गेलेल्या गुन्हेगारास तुरुंगात संपूर्ण रात्रभर गाढ शांत झोप मिळते तो.

# ८३. नापितद्वयम्

(अनुष्टुभ्वृत्तम्)

**सर्वत्र नापिताः सन्ति ग्रामेषु च पुरेषु च ।**
**ग्रामस्थस्य पुरस्थस्य मध्ये भेदश्च वर्तते ।**
**पौरः करे क्षुरं धृत्वा प्रयुङ्क्ते क्षौरकर्मणि ।**
**जल्पको नापितो ग्राम्यः प्रयुङ्क्ते वदनं करम् ।।**

अनुवाद – **दोन न्हावी**

शहरात व खेड्यात सर्व ठिकाणी न्हावी असतात. खेड्यातील न्हावी व शहरातील न्हावी याच्यात फरक असतो.

शहरातील न्हावी वस्तारा हातात धरुन क्षौरकर्मात वापरतो. मात्र खेड्यातील बडबडणारा न्हावी त्यासाठी हातातील वस्तरा व तोंड वापरतो.

# ८४. नापितविधिज्ञौ

**नापितस्य विधिज्ञस्य मध्ये भेदस्समानता ।**
**शिरसा सह संबन्धः जीविकायां द्वयोरपि ।।**
**साधुवृत्तस्तयोर्मध्ये नापितो वर्ततेऽधुना ।**
**कार्यात्पूर्वं न गृह्णाति ग्राहकात् स्वधनं खलु ।।**

अनुवाद – **न्हावी आणि वकील**

न्हावी आणि वकील यांचेमध्ये भेद तसेच समानताही आहे. दोघांच्याही धंद्यात डोक्याशी संबंध आहे. चालू काळात त्या दोघांमध्ये न्हावी हा प्रामाणिक आहे. अहो काम होणेपूर्वी तो गिऱ्हाईकाकडून कधीच पैसे घेत नाही.

# ८५. देहस्य व्याख्या

**अथैकदा श्रावणमासे एकस्मिन्नगरे प्रवचनमालिकायां भाषमाणो विद्वद्वरः देहविषये भाषते । --- परोपकाराय इदं शरीरम् । किन्तु अद्यतनकाले देहस्य का व्याख्या दृश्यते ? शृण्वन्तु भवन्तः ।**

**देहो जनानां निजभोगशाला । प्रयोगशालास्ति चिकित्सकानाम् ।।**
**वणिग्जनानां व्यवसायशाला । आरक्षिता जन्तुविहारशाला ।।**
**कालाय तस्मै नमः ।**

अनुवाद – **देहाची व्याख्या**

एकदा श्रावण महिन्यात प्रवचन मालिकेत प्रवचन देणारे एक विद्वान मनुष्यदेहाबद्दल सांगतात – हे शरीर परोपकारासाठी आहे. परंतु आजकाल देह म्हणजे काय दिसते ते ऐका.–

देह म्हणजे लोकांचे स्वतःचे भोग भोगण्याचे ठिकाण आहे. डॉक्टरलोकांची ती एक
प्रयोगशाळा आहे. व्यापारी (केमिस्ट) लोकांचे तर ते धंद्याचे ठिकाण आहे.
तसेच देह म्हणजे रोगजंतूंना आनंदाने विहार करण्याची ती राखीव जागा आहे.
चालायचंच. हा काळाचा महिमा आहे.

# ८६. वरयाचनम् (वरयाचना)

**१) गुरुं ययाचे तरुणो वरार्थम् । न ताडनं मे प्रभवेत् कराभ्याम् ।।**
**किं कर्म ते पृच्छति सद्गुरुस्तम् । वृत्त्या भटः भारतशासनस्य ।।१।।**

अनुवाद : एका तरुणाने आपल्या गुरुकडे वर मिळणेसाठी अशी मागणी केली की, माझ्या हातांनी कोणालाही मारबसू नये. सद्गुरु त्यास विचारतात, 'तू काय काम करतोस?' (तो म्हणतो) 'मी भारतसरकारचा पोलीस आहे.' **(भटः =पोलिस)**

**२) गुरुं ययाचे पुरुषो वरार्थम् । स्पर्शो हि मा भूत् ललनाकराणाम् ।।**
**किं कर्म ते पृच्छति सद्गुरुस्तम् । मुख्यापणे कांबविकोऽस्मि वृत्त्या ।।**

अनुवाद : एक पुरुष गुरुंकडे असा वर मागतो की, स्त्रियांच्या हाताला माझा स्पर्श होऊ नये. गुरु त्यास विचारतात, तू काय काम करतोस? तो म्हणतो, मुख्य बाजारपेठेतील मी कासार आहे.

**३) गुरुं ययाचे पुरुषो वरार्थम् । मुखेऽनृतं मे न भवेत् कदापि ।।**
**किं कर्म ते पृच्छति सद्गुरुस्तम् । आरोपितानामभिभाषकत्वम् ।।**

अनुवाद : एक पुरुष गुरुकडे असा आशीर्वाद मागतो मी, माझ्या तोंडी कधीही खोटे येऊ नये. सद्गुरु त्यास विचारतात, तू काय काम करतोस? (तो म्हणतो) आरोपींची वकिली.

**४) गुरुं ययाचे तरुणो वरार्थम् । न रक्तपातः प्रभवेत् कराभ्याम् ।।**
**किं कर्म ते पृच्छति सद्गुरुस्तम् । आखेटको वंशपरंपरेण ।।**

अनुवाद : एक तरुण गुरुकडे वर मागतो, की माझ्या हाताने रक्तपात होऊ नये. सद्गुरु त्यास विचारतात, की तुझे काम काय? (तो म्हणतो) मी वंशपरंपरेने खाटीक आहे.

# ८७. प्रहेलिका – (१)

(उपजातिवृत्तम् )

**के सन्ति लोकेषु परीक्षमाणाः । कोषान् नराणां स्वकरैः स्वभावात् ।।**
**गृहे प्रवासे द्रुतरेलयाने । चौरो भटो वा रजकश्च भार्या ।।**

अनुवाद –

**कूटप्रश्न –(१)**

घरात, प्रवासात, धावत्या रेल्वेत स्वभावतः पुरुषांचे खिसे तपासणारे लोकांमध्ये कोण आहेत? (अहो) चोर, पोलीस किंवा धोबी आणि पत्नी हे आहेत कां?

---

# ८८. प्रहेलिका – (२)

(उपजातिवृत्तम्)

**स्थानानि सर्पस्य कियन्ति सन्ति । जलं च भूमिश्च गृहं च नालः ।।**
**तथापि तस्यास्त्यपरा स्वभूमिः । गूढा प्रिया साऽपि सुरक्षिता च ।।१।।**

**न तत्र वृष्टिर्नच तत्र तेजः । न शीतबाधा न च वातपीडा ।।**
**घनान्धकारः खलु वर्ततेऽत्र । एषाऽस्ति सर्पस्य ही पञ्चमी भूः ।।२।।**

**जानाति को वा बुधवाचकेषु । किं नाम सर्पस्य निगूढभूमेः ।।**
**तस्योत्तरं स्यात् कठिनं महद्वा । तदस्ति किं वा विवरं द्रुमस्थम् ।।३।।**

अनुवाद –

**कूटप्रश्न –(२)**

सर्पाची किती ठिकाणे आहेत? पाणी, जमीन, घर व पाईप आहेत. परंतु त्याची वेगळी अशी स्वतःची जागा आहे व ती गुप्त, त्याची आवडती व सुरक्षित सुद्धा आहे. ।।१।।

त्या ठिकाणी पाऊस नाही, प्रकाश नाही, थंडीचा त्रास नाही. तसेच वारा-वादळही नाही. येथे दाट काळोख आहे. आणि हीच सर्पाची पाचवी जागा आहे. ।।२।।

सर्पाच्या या गुप्त जागेची माहिती जाणकार वाचकांपैकी कोणास आहे का? त्याचे उत्तर फार कठीण असेल का? अहो ती जागा तर झाडात असलेली ढोली (पोकळ जागा) आहे का? ।।३।।

# ८९. समस्यापूर्तिः

**शिक्षेत दक्षतां कस्मात् । वनानां कोऽस्ति रक्षकः ।।**
**चौरः करोति किं भीत्वा । शुनो व्याघ्रः पलायते ।।**

अनुवाद – **समस्यापूर्ती**

दक्षता कोणापासून शिकावी? वनांचे रक्षण करणारा कोण आहे?
घाबरल्यावर चोर काय करतो? कुत्र्यापासून वाघ पळून जातो.

या समस्यापूर्तीतील प्रश्नांची उत्तरे –

पहिल्या चरणातील प्रश्नाचे उत्तरे चवथ्या चरणाचा पहिला शब्द आहे. दुसऱ्या चरणातील प्रश्नाचे उत्तर चवथ्या चरणातील दुसरा शब्द आहे व तिसऱ्या चरणातील प्रश्नाचे उत्तर चवथ्या चरणातील तिसरा शब्द आहे.

---

# ९०. विस्मितगृहम्

(उपजातिवृत्तम्)

**गेहं मदीयं पटलं न यस्य द्वारं हि नास्त्यस्य तथैव सीमा ।**
**विशन्ति लोकाश्च बहिः प्रयान्ति कालान्तरे ते निजलाभबुद्ध्या ॥१॥**

**जानाति को मे भवनस्य नाम तदस्ति गूढं कठिनं महद्वा ।**
**किञ्चिद्भवन्तः हृदि चिन्तयन्तु तद् 'राजपक्षः' पृथुरस्ति किं वा ॥२॥**

अनुवाद – **चमत्कारिक घर**

ज्याला छप्पर नाही, दारपण नाही, तसेच हद्दही नाही, असेमाझे घर आहे. लोक त्यात शिरतात व कालांतराने स्वतःचा फायदा व्हावा ह्या उद्देशाने बाहेर पडतात.

माझ्या घराचे नाव कोणास माहित आहे का? ते गुप्त किंवा फार कठीण आहे का? (आपल्या) अंतःकरणात थोडा विचार करा. अहो, ते तर मोठा 'राजकीय पक्ष' असे आहे.

# ९१. वेतनवृद्धिः

**अथैकदा कस्यचित् सज्जनस्यविशाले फलोद्याने कार्यं कुर्वाणाः त्रयः भृत्याः आसन्। तेषु एकः पुष्टकायः आलस्यशीलः तथा उद्धतः च आसीत्। एकस्मिन् दिने सज्जनस्य आज्ञापालकः विश्वसनीयः द्वितीयः भृत्यः आम्रवृक्षस्य अधः एकाकिनं उपविष्टं स्वामिनं ब्रवीति, 'महोदय, अहं जानामि यत् भवान् अस्मत्सु आलस्यशीलस्य भृत्यस्य विषये चिन्तितोऽस्ति। भवान् तस्य वेतनं न्यूनीकर्तुम् इच्छतीति मया स्वामिनीमहोदयायाः श्रुतम्।'**

**स्वामी ब्रवीति, 'आम् अहं तदेव चिन्तयामि। किन्तु तेन सः भृत्यः क्रुद्धः भवेत्।' द्वितीयः भृत्यः वदति 'भोः स्वामिन् , चिन्तां मा करोतु। तस्य विद्यमानं वेतनमेव रक्षतु भवान्। वेतनस्य न्यूनीकरणात् तस्य कुटुम्बस्य हानिः भवेत्। तस्योपरि अन्यायोऽपि भवेत्। तदर्थं अहम् उपायमेकं सूचयेयम् वा ?' स्वामी सानन्दं वदति, 'कथय कथय आवयोः द्वयोः वेतनम् अव्यक्तं (निभृतं) वर्धयतु येन तस्य वेतनं स्वयंप्रेरितं न्यूनं भवेत्।'**

अनुवाद – **पगारवाढ**

एकदा एका सज्जनाच्या विशाल फळबागेत काम करणारे तीन नोकर होते. त्यातील एक नोकर जाडजूड, आळशी व उद्धट होता. एकदा आंब्याच्या झाडाखाली एकांतात बसलेल्या मालकास तेथील आज्ञाधारक, विश्वासू दुसरा नोकर म्हणतो, 'मालक मला असे समजते की आमच्यापैकी आळशी असलल्या नोकराच्या बाबतीत आपण विचार करीत आहात. आपण त्याचा पगार कमी करु इच्छिता असे मी मालकीणबाईंकडून ऐकले आहे.'

मालक म्हणतात, 'होय मी तोच विचार करीत आहे. परंतु त्यामुळे तो रागावेल.' दुसरा नोकर म्हणतो 'मालक काळजी करु नका. त्याचा पगार आहे तोच ठेवा. त्याचा पगार कमी केला तर त्याच्या कुटुंबाचे नुकसान होईल व त्याचेवर अन्यायही होईल. त्यसाठी मी आपणास उपाय सूचवू कां?' मालक आनंदाने म्हणतो 'सांग, सांग'. 'आमच्या दोघांचा पगार गुपचुप वाढवा. त्यामुळे त्याचा पगार आपोआप कमी होईल.'

# ९२. यत्र भावः तत्र देवः

**कस्मिंश्चिन्नगरे कश्चित् सज्जनः निवसति स्म। कस्माच्चित् विपणिकात् तैलशर्कराधान्यादीनि वस्तूनि नित्यं क्रीणाति स्म। अथैकदा मार्गेण चलन् सम्मुखमागतं विपणिकं मुहूर्तमेक स्थित्वा वदति, 'भोः महोदय, अहं भवन्तं, प्रश्नमेकं पृच्छेयम् वा? विपणिकः ग्रीवां किञ्चित् अवनमय्य सम्मतिं दर्शितवान्।**

**सज्जनः वदति, 'भवद्विपण्यां फलकमेकं स्थापितमस्ति। तस्मिन् लिखितमस्ति *यत् यत्र भावः तत्र देवः*। वस्तुतः *विश्रम्भः स्तम्भितः* वा *विश्रम्भेण न दीयते* इत्यादीनि वचनानि फलकेषु सन्ति। कथमेतद् ?' विपणिकः वदति, 'महान् विठ्ठलभक्तः सावतामाळी यद् वदति तदेव अहम् अनुतिष्ठामि। *पलाण्डुमूलिकाशाकं विठाई केवलं मम* । अतः विक्रयार्थं स्थापितानि सर्वाणि वस्तूनि एव विपणिकानां देवः वर्तते। यदा वस्तूनां मूल्यं वर्धते तदा अस्माकं विपणिकानां प्रभूतः लाभः भवति। ज्ञातं वा।'**

अनुवाद – **भाव तेथे देव**

कोण्या एका गावात एक सद्गृहस्थ रहात होता. एका व्यापाऱ्याकडून तो नेहमी तेल साखर धान्य इत्यादी वस्तु खरेदी करीत असे. एकदा रस्त्याने चालताना समोरून आलेल्या त्या व्यापाऱ्यास थोडा वेळ थांबून विचारतो, 'अहो महोदय, मी आपल्याला एक प्रश्न विचारू का? ' व्यापारी थोडी मान वाकवून होकार देतो.

सद्गृहस्थ विचारतो, 'तुमच्या दुकानात एक बोर्ड आहे. त्यावर लिहिले आहे की, 'भाव तेथे देव'. वास्तविक 'उधारी बंद आहे' किंवा 'उधारीने देत नाही' असे बोर्ड असतात. हे कसे काय? त्यावर दुकानदार म्हणतो, 'अहो महान विठ्ठलभक्त सावतामाळी यांनी म्हटल्याप्रमाणेच मी व्यवहार करतो आहे, कांदा मुळा भाजी, अवघी विठाई माझी. म्हणून विक्रीसाठी ठेवलेल्या सर्व वस्तू हाच माझा देव आहे. जेव्हा वस्तूंचा भाव वाढतो त्यावेळी आमच्या दुकानदारांचा मोठा फायदा होतो. समजले कां? '

# ९३. आज्ञापालनम्

अथैकदा कोणकणप्रदेशे निवसतः पौत्रस्य गृहं गन्तुम् इच्छन्ती काचित् वृद्धा कस्मिंश्चित् ग्रामे राज्यपरिवहनस्य लोकयानं प्राविशत्। मार्गमध्ये कदाचित् वमनं भवेत् इति विचार्थ सहयात्रिकस्य सम्मत्या वातायनस्य निकटं सा उपाविशत् । मार्गे कस्यचित् ग्रामस्य नाम उच्चार्य वृद्धा वाहकं ब्रवीति, 'भोः बन्धो, यदा एतद् ग्रामम् आगमिष्यति तदा मां वद।' झटिति वाहकः तं वदति, 'भोः महोदये, तद् ग्रामं तु अधुना एव अतीतम् अस्ति।'

एतत् सम्भाषणं शृण्वन्तः त्रिचतुर्यात्रिकाः वाहकं वदन्ति, 'भोः महोदय, लोकयानं पूर्वस्थलं प्रतिनयतु यतः पूर्वस्थलं नातिदूरं वर्तते।' वाहकः दयालुः तथा भाले सिन्दूरतिलकं धारयन् कस्यचित् गुरोः साप्ताहिकप्रवचने नित्यगामी आसीत् । चालकोऽपि तद् अमन्यत। सपदि चालकः यानं पूर्वस्थलम् आनीतवान् । किन्तु वृद्धा न अवतरत् ।

सा अब्रवीत् , 'मम चिकित्सकः यात्रायाः प्रारम्भे मह्यम् एकां गुलिकाम् अयच्छत् अकथयत् च यदा एतद् ग्रामम् आगमिष्यति तदा यानस्य विरामावधौ एतां गुलिकाम् अल्पमात्रेण जलेन सह भक्षयतु भवती।' वराकौ चालकवाहकौ।

अनुवाद – **आज्ञापालन**

एकदा एक म्हातारी कोकणात नातवाचे घरी जाण्यासाठी एका गावात एस.टी. बसमध्ये शिरली. वाटेत कदाचित उलटी होईल असा विचार करुन शेजारच्या प्रवाशाच्या संमतीने ती खिडकीजवळ बसली. रस्त्यात एका गावाचे नाव घेऊन ती कंडक्टरला म्हणते, 'भाऊ सदर गाव येईल तेव्हा मला तू सांग.' लगेच कंडक्टर तिला म्हणतो, 'आजी, ते गाव तर नुकतेच गेले आहे.'

हे भाषण ऐकणारे तीन-चार प्रवासी कंडक्टरला म्हणतात, 'अहो साहेब ही गाडी

गेलेल्या स्टॉपवर मागे न्या, कारण तो फार दूर नाही.' कंडक्टर दयाळू , तसेच कपाळावर शेंदूराचा टिळा लावणारा, कोणत्यातरी गुरुंच्या साप्ताहिक बैठकीस नियमित जाणारा होता. गाडीचा ड्रायव्हरही त्यासाठी कबूल झाला. लगेचच ड्रायव्हरने गाडी पूर्वीच्या स्टॉपवर आणली. परंतु म्हातारी उतरली नाही.

ती म्हणाली, 'प्रवासापूर्वी माझ्या डॉक्टरांनी मला एक गोळी दिली व सांगितले की हे गाव ज्यावेळी येईल त्यावेळी एस.टी.च्या थांबलेल्या वेळात ही गोळी थोड्याशा पाण्याबरोबर खा.' बिचारे ड्रायव्हर-कंडक्टर.

*****



**सरस्वतीं पूजयितुं प्रदीर्घम्**
**गुम्फामि मालां चितशब्दरूपाम् ।**
**मन्ये तदर्थं लघुपूजको ऽहम्**
**नाहं कविर्वा न च लेखको वा।।**

(उपजातिवृत्तम्) --- स.त्र्यं. रहातेकर

 ***** 

पं सदाशिव त्र्यंबक रहातेकर लिखित
संस्कृताभ्यासाठी सर्वांना उपयुक्त विविध विषयांवरील प्रबोधक व रंजक
संस्कृत-काव्यसंग्रह ( मराठी अनुवादासह )




**वृत्तबद्ध व गेय रचना असलेल्या ह्या काव्यसंग्रहातील**
**काही वैशिष्ट्यपूर्ण विषय —**

स्वातन्त्र्यवीर सावरकर, पोखरण स्फोट, कारगील विजय, भारत-बांगलादेश बससेवा, दिल्ली-लाहोर बससेवा, धर्मवीर आनंद दिघे, डॉ. नीतू मांडके, नेत्रदातृगौरव, पाळणाघर, बालमन, चित्रकारगौरव, कालिदासगौरव, इ.

**।। शुभं भूयात् ।।**

卐 ***** 卐

## पं. सदाशिव त्र्यंबक रहातेकर यांचा परिचय



- **जन्म** – दि.२१/८/१९३३ (मु.कडाव, ता.कर्जत)
- **शिक्षण** – मॅट्रिक मार्च १९५२. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ पुणे येथील प्रथम व द्वितीय परीक्षा उत्तीर्ण (संस्कृत)
- **व्यवसाय** – १९९१ साली रेल्वेतून 'चीफ यार्ड मास्टर' या पदावरुन निवृत्त

- निवृत्तीनंतर काही वर्षे 'ज्येष्ठ नागरिक संघ, वनवासी कल्याण आश्रम, कोकण मराठी साहित्य परिषद, रेल्वे निवृत्त कर्मचारी संघ' इ. संस्थांमधून कार्य करताना आवडत्या संस्कृत विषयाचा पंडित काळेशास्त्री यांचे मार्गदर्शनाखाली अभ्यास. १९९७ पासून आजपर्यंत संस्कृत गद्यलेखन व वृत्तबद्ध काव्यरचनेचा व्यासंग.

- **सत्कार व पुरस्कार :**

१) दि.९/५/१९९९ जिल्हा व तालुकास्तरीय काव्यलेखन व वाचन स्पर्धेत प्रशस्तीपत्र, स्मृतीचिन्ह, अध्यक्ष को.म.सा.प. यांचेकडून
२) दि.७/६/१९९९ अध्यक्ष निवृत्त रेल्वे कर्मचारी फेडरेशन यांचेकडून
३) १९९९ कै. शाहीर अण्णाभाऊ साठे स्मृती पुरस्कार, पुणे येथे
४) दि.२१/११/१९९९ राज्य सरकारचे मानद संस्कृत सल्लागार पं. श्री.धुं. कवीश्वर यांचेकडून कल्याण येथे सत्कार
५) दि.३०/४/२००० रायगड जिल्हा वृत्तपत्र लेखक संघाकडून 'समाजभूषण' पुरस्कार
६) दि.२८/४/२००२ कर्जत येथे रायगड जिल्हा मराठी साहित्य संमेलनात कविवर्य पदम्श्री कै.नारायण सुर्वे यांचेकडून सत्कार.
७) दि.२१/५/२००२ अध्यक्ष ज्येष्ठ नागरिक संघ यांचेकडून सत्कार.
८) दि.९/४/२०१६ सनातन धर्मसभा अहमदनगर यांचेकडून पू.जगद्गुरु शंकराचार्य करवीरपीठ यांचे हस्ते शाल, श्रीफळ, स्मृतिचिन्ह देऊन अहमदनगर येथे सत्कार.
९) दि.११/५/२०१६ 'आदर्श साहित्यिक' पुरस्कार 'साप्ताहिक रायगडची खाण', कर्जत यांचेकडून
१०) दि.१६/७/२०१६ लक्ष्मीकांत सार्वजनिक वाचनालय, कर्जत यांचेकडून कविकुलगुरु कालिदास दिनानिमित्त सत्कार
(माझ्या जन्मगावचे वैदिक पंडित कै. त्र्यंबक नारायण रहातेकर व कै.भालचंद्र गणेश उपाध्ये तसेच संस्कृतचे गाढे अभ्यासक, कवी, लेखक कै.भास्कर केशव कोशे हे विद्वान होऊन गेले आहेत.)